मुंबई विद्याखात्यानें टेक्स्ट म्हणून मंजूर केलेलें

# आपलें बोलणें

## पुस्तक १ लें

[ तिसऱ्या व चौथ्या इयत्तेकरितां ]

( सुधारून वाढविलेली आवृत्ति तिसरी )

लेखक—मोरेश्वर सखाराम मोने
( अध्यापक—'अध्यापिकाशाला,' हिंगणें, पुणें )

मॅक्मिलन् आणि कंपनी, लिमिटेड,
हॉर्नबी रोड, कोट, मुंबई



किंमत ४ आणे

# प्रस्तावना

## ( आवृत्ति तिसरी )



“ **आपलें बोलणें** ” किंवा त्या बोलण्याची रीत अथवा त्या बोलण्यांतला ठराविकपणा हीं कशीं आहेत व आपल्या बोलण्यांतल्या प्रत्येक शब्दाचा उपयोग व महत्त्व काय, ह्या गोष्टी विद्यार्थ्यांना समजावून देण्यासाठीं मीं इयत्तावार लिहिलेल्या पुस्तकांपैकीं तिसऱ्या व **चौथ्या इयत्ते**करितां लिहिलेलें हें **पहिलें पुस्तक** होय.

हीं पुस्तकें प्रो० **रामचंद्र कृष्ण लागू** एम्० ए० ( सर “परशुरामभाऊ कॉलेज”–पुणें ) यांचे प्रोत्साहनामुळें मीं प्रथम छापून काढलीं. कोणत्याही इमारतीचें रफ स्केच बनवावें लागतें, त्याप्रमाणें हीं पुस्तकें पुढें सुधारावीं लागतील हें ध्यानांत ठेवूनच मीं तीं छापलीं होतीं. नंतर अनेक सुधारणा करून द्वितीयावृत्ति छापिली व आतां ही तृतीयावृत्ति तज्ज्ञांच्या सेवेस अर्पण करीत आहें.

प्रो० **दत्तो वामन पोतदार,** बी०ए० (“सर परशुरामभाऊ कॉलेज”–पुणें) ह्यांचा-माझा तीन-चार वर्षें ह्या व्याकरणलेखनाचे बाबतींत संबंध आला होता; त्याचप्रमाणें आमच्या येथील प्रो०. **वामन मल्हार जोशी,** एम्०ए० (“महिला–पाठशाला” एरंडवणें–पुणें) ह्यांच्याशींही आज तेरा–चौदा वर्षें एकाच संस्थेंत काम करीत असल्यामुळें विचारविनिमय चालू होता व आहे; तसेंच ते व्याकरण कमिटींत मेंबर होते यामुळें त्यांस प्राथमिक–शाळांत कोणत्या प्रकारच्या व्याकरण–पुस्तकांची जरूरी आहे हें अधिक अवगत होतें. ह्या दोघां प्रेमी जनांनीं आरंभीं जें मला साह्य केलें, त्याबद्दल सदैव कृतज्ञता व्यक्त करणें माझें कामच आहे.

त्याचप्रमाणें रा० रा० **महादेव काशीनाथ कारखानीस,** बी० ए० ( प्रिन्सिपल ऑफ “ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन”–धुळें ) ह्यांचे व्याकरणविषयक ‘कन्याशिक्षकां’तील लेख व “व्याकरण कसें शिकवावें” ह्यासंबंधीं त्यांच्या अनुभवयुक्त सूचना, त्यांस प्रत्यक्ष विचारून पूर्वी अमलांत आणिल्या होत्या; आणि दुसऱ्या आवृत्तीचे वेळीं तर त्यांस व माझे मित्र रा० रा० **गोविंद**

**बळवंत मोकाशी,** (शिक्षक-"ट्रेनिंग कॉलेज फॉर वुइमेन,"-पुणें) ह्यांस, ह्या पुस्तकांतील प्रत्येक बारीक सारीक देखील गोष्ट पाहण्याचा वारंवार त्रास देऊन, ह्या उभयतांच्या देखरेखीखालीं हरएक प्रकारची दुरुस्ती केली होती. ह्या विषयासंबंधीं माझा व्यासंग व पुस्तकांच्या सुधारणेसाठीं धडपड व कष्ट सोसण्याची चिकाटी हीं त्यांच्या ध्यानीं येऊन, त्यांनीं केवळ निर्व्याज प्रेमानें मला शिक्षण-शास्त्र, भाषारचना व विषयसुलभता ह्या गोष्टी साधण्यासाठीं, अत्यंत तसदी घेऊन साह्य केलें, ह्याबद्दल त्यांचाही मी फार ऋणी आहें. खरोखर पुस्तक माझें नसून एक प्रकारें त्यांच्याच मदतीचें फळ आहे.

याशिवाय आणखी एक गोष्ट सांगावयाची म्हणजे वाक्याची यथार्थ कल्पना व शब्दांच्या आठ जाति हा भाग तिसऱ्या इयत्तेंत शिक्षकांनीं तोंडींच सांगून शिकवावयाचा असतो; परंतु मुलांच्या हातांत द्यावयाच्या पुस्तकांत तो भाग व्यवस्थित स्वरूपांत असणें व त्याची उजळणी होणें अत्यंत आवश्यक वाटल्यानें तो ह्या पुस्तकांत स्वतंत्रपणें दाखल केला आहे. हा भाग संक्षिप्त रीतीनें देणें म्हणजे मुलांची समजूत व्हावी, हा जो शिक्षणाचा मुख्य हेतु तो गमावणें होय. त्याचप्रमाणें चौथ्या इयत्तेस व्याकरण कमिटीनें नेमलेल्या विषयांतही कांहीं काटकसर करितां येणें शक्य नव्हतें. प्रश्न व गृहपाठही भरपूर हवेतच; तेव्हां विषयाची ताडातोड करण्यापेक्षां ह्या एका पुस्तकांतच तिसरी व चौथी यांच्या विषयांचा, स्वतंत्र दोन भाग पाडून, समावेश केला आहे.

हीं पुस्तकें मुंबई विद्याखात्यानें **टेक्स्ट म्हणून मंजूर** केलीं आहेत. ह्या **तृतीयावृत्तींत** (१) क्वचित् कोठें जड शब्द आढळले त्यांबद्दल सोपे शब्द घातले आहेत, (२) कांहीं ठिकाणीं प्रश्न ज्यास्त घातले आहेत, (३) कोठें अस्पष्टता वाटली ती काढून टाकिली आहे, (४) कोठें छपाईची अधिक ठाकठिकी साधली आहे, इ० गोष्टी प्रिन्सिपल **महादेव काशीनाथ कारखानीस** यांचे अनुमतीनें केल्या आहेत.

"अध्यापिकाशाला"<br>हिंगणें, पुणें

आपला नम्र,<br>**मोरेश्वर सखाराम मोने**

# अनुक्रमणिका

# १

## [ तिसऱ्या इयत्तेच्या विषयाची उजळणी ]


| | | पृष्ठ |
|---|---|---|
| १. | भाषा .... .... .... .... | १ |
| २. | वाक्य म्हणजे काय ? .... .... .... | ३ |
| ३. | नांवांचे शब्द–नामें .... .... .... | ६ |
| ४. | वाक्याचा अर्थ पूर्ण करणारे क्रिया-शब्द – क्रियापदें .... | १० |
| ५. | नांवांच्या गुणांचे शब्द–विशेषणें .... .... | १४ |
| ६. | सर्व नामांच्या बद्दल येणारे शब्द–सर्वनामें–१ .... | १७ |
| ७. | सर्व नामांच्या बद्दल येणारे शब्द–सर्वनामें–२ .... | २० |
| ८. | क्रियांच्या गुणांचे शब्द–क्रियाविशेषणें .... .... | २३ |
| ९. | दोन शब्द किंवा दोन वाक्यें यांच्या मध्यें येणारे शब्द–उभयान्वयी .... .... .... .... | २६ |
| १०. | अन्य शब्दांना जोडून येणारे शब्द–शब्दयोगी .... | ३० |
| ११. | केवळ मनाचा विकार दाखविणारे शब्द–उद्गारवाचक.... | ३४ |

# अनुक्रमणिका

# २

[ चौथी इयत्ता ]


| | पृष्ठ |
|---|---|
| १. नामांचे भेद–१ | ३७ |
| २. नामांचे भेद–२ | ३९ |
| ३. सर्वनामांचे भेद–१ | ४२ |
| ४. सर्वनामांचे भेद–२ | ४५ |
| ५. विकारी व अविकारी शब्द | ४९ |
| ६. लिंग | ५२ |
| ७. वचन | ५७ |
| ८. विभक्ति–१ | ५९ |
| ९. विभक्ति–२ | ६२ |
| १०. कर्ता व कर्म | ६५ |
| ११. क्रियापदें | ६७ |
| १२. काळ | ६९ |
| १३. प्रयोग–१ | ७३ |
| १४. प्रयोग–२ | ७६ |
| १५. विरामचिन्हें | ७९ |
| १६. शब्दांची फोड | ८५ |

# आपलें बोलणें



[ तिसऱ्या इयत्तेकरितां ]

## १. भाषा



[ १ ]

काावळा ' काव काव ' करितो—कशाकरितां बरें ?

मांजर ' म्यांव म्यांव.' करितें—कां बरें ?

चिमण्या ' चिव चिव ' करितात—कशासाठीं ?

गाय ' हम्मा हम्मा ' करिते—कां ?

हे सर्व प्राणी आपल्याला काय पाहिजे तें सांगण्यासाठीं असें करितात; हें उघड आहे. कावळ्याला दुसरे कावळे यायला पाहिजे असतात, म्हणून त्यांना बोलावण्यासाठीं तो ' काव काव ' करितो. मांजराला दूध पाहिजे असलें, तर तें 'म्यांव म्यांव' करून दुसऱ्याला सांगतें. चिमण्यांना कांहीं खायला मिळालें किंवा त्यांना भय वाटलें, तर त्या ' चिव चिव ' करून दुसऱ्या चिमण्यांना सांगतात किंवा कळवितात. त्याचप्रमाणें वासराला हाक मारायची असली, म्हणजे गाय

' हम्मा हम्मा ' असें करिते. म्हणजे ह्या प्राण्यांना जें कांहीं पाहिजे असतें किंवा त्यांना जें कांहीं वाटत असतें, तें ते प्राणी ह्या प्रकारानें दुसऱ्यांना सांगत असतात.

[ २ ]

मुक्याला भूक लागली तर तो कसें सांगतो ? – तोंडाशीं हात नेऊन.

तो आपण रागावलों आहों हें कसें सांगतो ? – डोळे वटारून.

बाळाला दूध हवें असलें तर तें कसें सांगतें ? – रडून.

ह्या प्रकारें आपण माणसेंही आपल्याला काय पाहिजे असतें तें किंवा काय सांगायचें असतें तें दुसऱ्याला सांगतों; किंवा आपल्याला बोलतां येत असलें, तर आपण तोंडानें बोलून दुसऱ्याला जें काय सांगावयाचें असेल तें सांगतों.

पशु-पक्ष्यांना बोलतां येत नाहीं म्हणून तीं आपल्याला काय हवें तें काव काव, चिव चिव, यांसारख्या शब्दांनीं सांगतात; आणि आपण मनुष्यें तोंडानें बोलून किंवा खुणांनीं दुसऱ्याला आपल्या मनांत सांगायचें असेल तें सांगतों.

ह्या बोलण्याला किंवा सांगण्याला " **भाषा** " असें म्हणतात. **भाषा म्हणजे बोलणें.**

† † †

एवढ्या पाहण्यावरून आपल्यास आज कोणत्या गोष्टी कळून आल्या ?

**१. पशुपक्षी हम्मा हम्मा, काव काव, चिव चिव, यांसारख्या शब्दांनीं बोलतात.**

**२. मनुष्येंही शब्दांनीं अथवा खुणांनीं एकमेकांशीं बोलतात.**

**३. शब्दांनीं अथवा खुणांनीं बोललें, तरी ती भाषाच होते.**

**४. भाषा म्हणजे बोलणें.**

## प्रश्न

१. प्राणी एकमेकांना आपल्या मनांतील गोष्टी कोणत्या रीतीनें कळवितात ?

२. मनुष्यें आपल्या मनांतील गोष्टी मुख्यतः कोणत्या रीतीनें एकमेकांस कळवितात ?

३. भाषा म्हणजे काय ? भाषेचा उपयोग काय ?

४. आपली भाषा कोणती ? दुसऱ्या कांहीं भाषांचीं नांवें सांगा.

५. खुणांच्या भाषा तुम्हांस कांहीं माहीत असल्यास सांगा.

६. कावळे एकमेकांना कसे बोलावतात ? म्हैस, गाय, हीं वासरांना कशी हाक मारतात ? मांजराला भूक लागली म्हणजे तें काय करतें ? कसें सांगतें ?

---

# २. वाक्य म्हणजे काय ?

[ १ ]

### चिमूताईची गोष्ट

१ एक होती चिमणी.
२ एक होता कावळा.
३ चिमणीचें घर होतें मेणाचें.
४ कावळ्याचें घर होतें शेणाचें.
५ चिमूताईनें केली खीर.
६ ती लागली ढवळायला.
७ ती पडली खिरींत.
८ तेव्हां कावळ्यानें खिरीचा केला चट्टामट्टा.

### उंदीरमामाची गोष्ट

१ एक होता उंदीर.
२ तो वई वई धावे.
३ त्याला सांपडलें फडकें.
४ तें नेलें त्यानें शिंप्याकडे.
५ त्याची केली टोपी.
६ मग तो गेला राजाकडे.
७ राजा, मला टोपी.
८ तुला कोठें ?
९ ध्यारे त्याची टोपी हिसकावून.

अशा लहानपणीं पुष्कळ गोष्टी आपण ऐकतों. आपल्याला आजोबा, बाबा, आई, ताई, शिक्षक, अशा गोष्टी सांगतात. ह्या गोष्टींतल्या वरच्यासारख्या, जिथें आपण थांबतों, त्या एकेका तुकड्याला काय म्हणतात बरें ? त्यांना " **वाक्यें** " म्हणतात; त्यांतलें प्रत्येक एक एक " **वाक्य** " आहे; असें आपण चटकन सांगून टाकूं.

' एक होता कावळा '—हें एक **वाक्य**;

' एक होती चिमणी '—हें दुसरें **वाक्य**;

' कावळ्याचें घर होतें शेणाचें '—हें तिसरें **वाक्य**; इ०.

याप्रमाणें सांगण्यास आपल्यास कांहींच अडचण वाटणार नाहीं.

[ २ ]

परंतु हें आपलें म्हणणें सगळीकडे टिकलें पाहिजे, तरच खरें. त्यासाठीं आपण " वाक्या " चा आणखी विचार करूं. वरच्यासारखेच हे खालींही शब्द लिहिले आहेत; ह्यांना " **वाक्य** " म्हणतां येईल काय ? आपण शोधूं.

| | |
|---|---|
| १ रामानें काम करून .... | २ गोविंदा घरीं जातांना .... |
| ३ मीं आंबे खाल्लेले .... | ४ वासुदेव रेळत रेळत .... |
| ५ अहो येतां जातां .... | ६ बाळाला न्हाऊं पिऊं .... |

वरच्या गोष्टींतल्या प्रत्येक तुकड्यामध्यें आणि ह्या प्रत्येक तुकड्यामध्यें काय बरें फरक असावा ?

| | |
|---|---|
| (अ) वरच्या गोष्टींतला प्रत्येक तुकडा **पुरा** आहेसा वाटतो. | (अ) खालच्यांतला प्रत्येक तुकडा **अर्धवट** वाटतो. |

| | |
|---|---|
| (आ) वरचें बोलणें **संपलेलें** वाटतें. | (आ) खालचें बोलणें **संपलें नाहींसें** वाटतें. |
| (इ) वरच्यांत **अर्थही पुरा** होतो. | (इ) खालच्यांत **अर्थही अर्ध-वटच** होतो. |
| (ई) यांत बोलणाराचा **पुढें कांहीं बोलण्याचा हेतु दिसत नाहीं.** | (ई) यांत बोलणाराला **पुढें कांहीं सांगायचें आहे,** असें वाटतें. |

वरच्या गोष्टींतल्या तुकड्यांना आपण "**वाक्य**" म्हटलें. त्यांच्या-सारखेच केवळ खालचे तुकडे 'रामानें काम करून' इ० नाहींत, हेंही आपल्यास कळलें. मग ह्या दोहोंपैकीं "**वाक्य**" कोणतें? कां?

थोडा विचार केला तर आपलें आपल्यालाच कळून येईल कीं—

| **[हें वाक्य नाहीं.]** | **[हें वाक्य आहे.]** |
|---|---|
| (१) रामानें काम करून, | (१) रामानें काम केलें. |
| (२) गोविंदा घरीं जातांना, | (२) गोविंदा घरीं जातो. |
| (३) मीं आंबे खाल्लेले, | (३) मीं आंबे खाल्लेले वाईट होते. |
| (४) वासुदेव रेळत रेळत, | (४) वासुदेव रेळत रेळत जेवतो. |
| (५) अहो येतां जातां, | (५) येतां जातां देवाचें नांव घ्यावें. |

   

यावरून वाक्य व्हायला खालील गोष्टी पाहिजेत, असें आपल्यास कळून आलें.

**१. आपलें बोलणें अर्धवट उपयोगी नाहीं.**

**२. आपलें बोलणें पुरें पाहिजे.**

**३. आपल्या बोलण्याचा अर्थही पुरा झाला पाहिजे.**

**४. नुसत्या कशा तरी कांहीं शब्दांनीं वाक्य होणार नाहीं.**

या गोष्टी आज आपण नवीन हुडकिल्या.

## प्रश्न व गृहपाठ

१. लहान लहान वाक्यांची एक गोष्ट लिहून आणा.

२. वाक्यें नाहींत असे शब्दांचे तीन गट सांगा.

३. वाक्य व्हायला कोणत्या गोष्टी हव्यात ? कोणत्या नकोत ?

४. खालील शब्दांच्या गटांपैकीं कोणत्या गटांना वाक्यें म्हणाल ? कोणते गट वाक्यें नाहींत ?

(१) एक मुलगी वाचीत असतां, (२) तिला नीट समजावून सांगून, (३) फार अडखळते, (४) दुसऱ्यास फसवूं नये, (५) खोटें बोलून, (६) देवाला नमस्कार करावा, (७) मोरू परत आला, (८) सकाळीं सोनें लुटून, (९) सर्वांचा देव एकच आहे, (१०) एके दिवशीं, (११) एक कोल्हा, (१२) सांपळ्यांत सांपडला असतां, (१३) त्याची शेपूट तुटली.

५. वरील गट एकमेकांस जोडण्यासारखे असतील ते जोडून, तीन-चार वाक्यें सांगा.

---

# ३. नांवांचे शब्द—नामें

[ १ ]

**वाक्य** म्हणजे काय, हें आपल्यास मागील पाठांत समजलें. अशा कोणत्याही वाक्यांत अनेक शब्द असतात, हें आपल्यास माहीतच आहे; पण ते सगळे शब्द एकसारखेच असतात किंवा निरनिराळ्या

प्रकारचे असतात, तें आपण पाहूं व जसजसे त्यांचे निराळे प्रकार आपल्यास सांपडतील तसतसे ते वेगळे काढून आपण त्यांना नांवें देऊं.

१. " **गोविंदा आंबे खातो** " ह्या वाक्यांत—

' गोविंदा ' हें एका मुलाचें **नांव** आहे.

' आंबे ' हा शब्द एका फळाचें **नांव** आहे.

२. " **गाय वासरास दूध पाजिते** " ह्या वाक्यांत—

' गाय ' हा शब्द एका प्राण्याचें **नांव** आहे.

' वासरूं ' हा शब्द गाईच्या पाडसाचें **नांव** आहे.

' दूध ' हा शब्द एका पदार्थाचें **नांव** आहे.

३. " **चंद्राच्या प्रकाशामुळें आपणांस फार आनंद होतो.** "

ह्या वाक्यांत कोणते शब्द नांवें आहेत व कोणते नांवें नाहींत, हें आपण पाहूं या.

' चंद्र ' हा शब्द एका ग्रहाचें **नांव** आहे.

' प्रकाश ' हा शब्द उजेडाचें **नांव** आहे.

' आपणांस ' हा शब्द कांहीं कोणाचें **नांव** दिसत नाहीं.

' फार ' हा शब्दही कशाचें **नांव** नाहीं.

' आनंद ' हा शब्द आपल्या मनाला जें काय वाटतें त्याचें **नांव** आहे.

' होतो ' हा शब्द कांहीं कशाचेंच **नांव** नाहीं.

ह्यावरून असें आढळून आलें कीं, वाक्यांतले बरेचसे शब्द कशाचीं तरी **नांवें** असतात.

[ २ ]

जशीं वस्तूंचीं, माणसांचीं, प्राण्यांचीं, नांवें असतात; त्याचप्रमाणें आणखी कशाचीं नांवें असतात कीं काय, तें आपण शोधून पाहूं.

१ शिवाजी शूर होता. (त्याच्या त्या गुणाचें नांव काय?)....**शौर्य.**

२ पद्मिनी सुंदर होती. (तिच्या त्या गुणाचें नांव?)....**सुंदरपणा.**

३ बाजिरावाची वाणी मधुर होती. (त्याच्या त्या गुणाचें नांव?)...**माधुर्य.**

४ कर्ण मोठा उदार होता. (त्याच्या त्या गुणाचें नांव?)....**उदारपणा.**

५ रावण क्रूर होता. (त्याच्या त्या गुणाचें नांव?)....**क्रौर्य.**

६ धर्म सर्वांशीं सरळ वागे. (त्या गुणाचें नांव?)....**सरळपणा.**

ह्यावरून गुणांनासुद्धां **नांवें** असतात; गुणांच्या **नांवांचेही** शब्द असतात; असें आपल्यास आढळून आलें.

म्हणजे आपल्याला जिकडे–तिकडे खूपच खूप वस्तु, प्राणी, पशु, पक्षी, फळें, झाडें, डोंगर, नद्या, शहरें, तारे, इ० दिसतात; आणि त्यांच्या अंगीं जे गुण असतात त्या सर्वांबद्दलही आपणांस बोलावें लागतें; म्हणून आपल्या बोलण्यांत ह्या सर्वांचीं **नांवेंच नांवें** येतात. ह्या नांवांच्या शब्दांना " **नामें** " असें दुसरें नांव आहे.

   

एवढा विचार करून आपण काय शोधून काढिलें?

**१. आपल्या बोलण्यांत नांवांचे शब्द पुष्कळ असतात.**

**२. खऱ्या किंवा कल्पित प्राण्यांच्या व वस्तूंच्या नांवांचे शब्द असतात.**

**३. गुणांच्या नांवांचेही शब्द असतात.**

**४. कोणत्याही प्राण्याचें, अथवा वस्तूचें, अथवा गुणाचें नांव दाखविणारा जो शब्द त्याला "नाम" असें म्हणतात.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. आपल्या बोलण्यांत पुष्कळ शब्द कोणत्या प्रकारचे असतात ? कां ?

२. पुरुषांचीं दहा नांवें सांगा; स्त्रियांचीं दहा नांवें सांगा.

३. पशूंचीं, पक्ष्यांचीं व सरपटणाऱ्या जनावरांचीं पांच पांच नांवें सांगा.

४. गांवांचीं, नद्यांचीं, शहरांचीं, किल्ल्यांचीं, दहा दहा नांवें सांगा.

५. झाडांचीं, फळांचीं, वेलींचीं, दहा दहा नांवें सांगा.

६. मोठेपणा, लहानपणा, शौर्य, धैर्य, शत्रुत्व, मित्रत्व, अशीं गुणांचीं दहा नांवें घरून लिहून आणा.

७. खालील वाक्यांतील नामें असतील तेवढेच शब्द सांगाः—

( १ ) पैठणास एकनाथांच्या वाड्यांत गंगेस जाण्या-येण्याच्या वाटेवर एक अरुंद व लांब पडवी आहे. ( २ ) सूर्य गजांच्या खिडकींतून हात घालून आपणांस उठवितो. ( ३ ) मुलांना मनोरंजक गोष्टी फार आवडतात. ( ४ ) नाना म्हणाला, ( ५ ) मने, तूं आरसा फोडिलास. ( ६ ) एका तळ्यांत कांहीं बेडूक होते. ( ७ ) त्यांना ते दगड लागले. ( ८ ) मुलगे म्हणाले, ( ९ ) आम्ही भाकरीचा खेळ खेळत आहों. ( १० ) एकदां ससा व कासव ह्यांची पैज लागली. ( ११ ) कासव हळू हळू डोंगराशीं जाऊन पोंचलें. ( १२ ) सशाची शेवटीं फजिती झाली. ( १३ ) कष्टांशिवाय मोठेपणा येत नाहीं. ( १४ ) कोणाशींही शत्रुत्व नसावें. ( १५ ) विनायकाला राग आला. ( १६ ) त्याचें मन आवरेना.

---

# ४. वाक्याचा अर्थ पूर्ण करणारे क्रिया-शब्द—क्रियापदें

[ १ ]

| | | |
|---|---|---|
| १ | गोपाळा | वाचितो |
| २ | रामानें | मारिलें |
| ३ | पोपट | उडेल |
| ४ | बाबांनीं | यावें |
| ५ | घड्याळ | आहे |
| ६ | फुलें | उमलतात |

ह्या वाक्यांतील पहिले शब्द नांवें आहेत, हें आपल्याला माहीतच आहे. त्याचप्रमाणें दुसरे शब्द **वाचितो, मारिलें, उडेल, यावें, आहे, उमलतात,** हीं कशाचीं नांवें आहेत ?

हे शब्द कशाचींच नांवें दिसत नाहींत.

मग हे शब्द काय काम करीत आहेत बरें ? आपणांस सहजच कळून येईल कीं,—

(१) गोपाळा काय 'करितो' हें सांगण्यासाठीं **वाचितो** हा शब्द आला आहे. (२) रामानें काय 'केलें' हें सांगण्यासाठीं **मारिलें** हा शब्द आला आहे. (३) पोपट काय 'करील' हें सांगण्यासाठीं **उडेल** हा शब्द आला आहे. (४) बाबांनीं काय 'करावें' हें सांगण्यासाठीं **यावें** हा शब्द वाक्यांत आला आहे. (५) घड्याळाचें 'असणें' सांगण्यासाठीं **आहे** हा शब्द आला आहे व (६) फुलांचें 'उमलणें' सांगण्यासाठीं **उमलतात** हा शब्द योजिला आहे.

ह्यावरून असें दिसतें कीं, प्राणी किंवा वस्तु काय '**करितात**' किंवा त्यांनीं काय '**केलें**' किंवा तीं काय '**करणार आहेत**' किंवा तीं केवळ '**आहेत**' किंवा '**नाहींत**' असें कोणत्याही प्रकारचें "करणें" किंवा "असणें" किंवा "नसणें" सांगण्यासाठीं हे वाक्याच्या शेवटचे शब्द येतात.

कोणत्याही प्रकारचें "**करणें**" किंवा "**असणें–नसणें**" यालाच "**क्रिया**" असा दुसरा चांगला शब्द आहे.

[२]

आतां हे खालचे शब्द पहा व त्यांतही कांहीं "**क्रिया**" आहे कीं नाहीं, तें शोधा:—

(१) वामन **जेवून**, (येथें वामनाच्या 'जेवण्या' बद्दल सांगितलें आहे.)
(२) वामन **जेवितांना**, (येथेंही त्याच्या 'जेवण्या' बद्दल सांगितलें आहे.)
(१) कोल्हा उड्या **मारून**, (येथें 'मारण्या' बद्दल सांगितलें आहे.)
(२) कोल्हा उड्या **मारितांना**, (येथेंही 'मारण्या' बद्दलच सांगितलें आहे.)
(१) देव जवळ **असतां**
(२) देव जवळ **असून** } (ह्या दोन्ही ठिकाणीं देवाच्या 'असण्या' बद्दलचेंच बोलणें आहे.)
(१) जवळ रुपये **नसतां**
(२) जवळ रुपये **नसून** } ('ह्या दोन्ही ठिकाणीं रुपयांच्या 'नसण्या' बद्दलच बोलणें आहे.)

ह्यांप्रमाणें **करितो–केलें–करील**, **जेवितो–जेवला–जेवील**, ह्यांसारखेंच **करून–करितां–करितांना**, **जेवून–जेवतां–जेवतांना**, ह्यांमध्येंही निरनिराळ्या प्रकारचें "**करणें**" म्ह० "**क्रिया**" आहे; मग ह्या दोहोंत फरक काय?

[ ३ ]

हा फरक हुडकून काढण्यासाठीं आपण ह्या शब्दांचा आणखी लक्षपूर्वक विचार केल्यास, हें आपल्या स्पष्टच ध्यानांत येईल कीं, दोन्ही ठिकाणीं “ **करण्याचे** ” म्ह० **क्रियेचे** शब्द आहेत; परंतु पहिल्या ठिकाणीं काय केलें, किंवा काय आहे,-नाहीं, हें **पुरें सांगितलें आहे,** अशा प्रकारचे हे करण्याचे म्ह० **क्रियेचे** शब्द आहेत; व दुसऱ्या ठिकाणीं करणें म्ह० **क्रियाच** आहे, पण ती **पुरी सांगितली नाहीं; अधर्वटच आहे;** अशा प्रकारचे ते क्रियेचे शब्द आहेत.

शिवाय, आणखी विचार केला तर असें आढळून येईल कीं, वाक्य व वाक्याचा अर्थ पहिल्या क्रिया-शब्दांनीं पुरा होतो; दुसऱ्या क्रिया-शब्दांनीं वाक्य व वाक्याचा अर्थ कधींच पुरा होत नाहीं. वाक्याचा अर्थ पुरा करणाऱ्या क्रिया-शब्दांना “ **क्रियापद** ” असें दुसरें नांव आहे. इतर क्रिया-शब्द असले तरी ते क्रियापदें नाहींत.

   

ह्यावरून कोणत्या गोष्टी आपणांस सांपडल्या व त्यांबद्दल आपल्यास काय ठरवितां येईल ?

**१. जातो, करितो, करील, केलें, मारीन, बसतात, यांसारखे क्रिया-शब्द वाक्याचा अर्थ पूर्ण करणारे आहेत.**

**२. करून, करितां, देऊन, येतां, बसून, बसतांना, इ० शब्द क्रिया दर्शविणारेच आहेत, पण ते वाक्य व त्याचा अर्थ पूर्ण करीत नाहींत.**

**३. नांवांच्या प्रमाणेंच वाक्य व त्याचा अर्थ पुरा करणारे हे कोणत्याही प्रकारच्या क्रियांचे शब्द आपल्या बोलण्यांत पुष्कळ येतात.**

**४. वाक्याचा अर्थ पूर्ण करणाऱ्या क्रिया-शब्दांना " क्रियापद " म्हणतात.**

## प्रश्न व गृहपाठ

१. क्रियांचे शब्द किती प्रकारचे असतात ? ते प्रकार कोणते ?

२. पांच नांवांचे शब्द घ्या व त्यांस क्रियापदें जोडून वाक्यें बनवून दाखवा. घरून अशीं पांच वाक्यें लिहून आणा.

३. येतो, मारील, खाल्लें, बसा, हंसून, उडाला, पळतांना, घडो, द्यावें, खातां, चरतात, बसूं, नसतील, असेल, येऊन, येईन, ह्यांतील कोणते शब्द क्रियापदें आहेत, व कोणते क्रियापदें नाहींत ? कां ?

४. वरच्या शब्दांपैकीं जे शब्द क्रियापदें असतील, ते घेऊन त्यांचे पूर्वीं एकेक नामाचा शब्द जोडून वाक्यें बनवून दाखवा.

५. वाक्य व त्याचा अर्थ कोणत्या शब्दांनीं पुरा होतो ? कोणत्या शब्दांनीं होत नाहीं ?

६. खालील गोष्टींतील क्रियापदें सांगाः—

(क) एक होता उंदीर. तो वई वई धावे. त्याला सांपडलें फडकें. तो गेला शिंप्याकडे. शिंप्यानें त्याला दिली एक टोपी. मग तो गेला राजाकडे. आणि म्हणाला. राजा, मला टोपी. तुला कुठें ? राजा म्हणाला. घ्यारे त्याची टोपी हिसकावून.

(ख) एक होतें गाढव. त्यानें सिंहाचें कातडें पांघरलें. तेव्हां त्याला सर्व पशु भ्याले व ते दूर पळाले. त्यांना हांक मारण्यासाठीं गाढव मोठ्यानें ओरडलें. त्यामुळें सर्व पशूंना त्याचा खोटेपणा कळला; आणि त्यांनीं त्याला लाथांनीं व शिंगांनीं मारिलें. त्यामुळें अखेर तें मेलें. मरतांना तें म्हणालें, जो खोटें काम करितो, त्यास अशीच शिक्षा होते.

# ५. नांवांच्या गुणांचे शब्द–विशेषणें

[ १ ]

१. (क) गाय व्याली.
(ख) **काळी** गाय व्याली.

२. (क) घोडा पळाला.
(ख) **पांढरा** घोडा पळाला.

३. (क) मुलगा शाळेंत जातो.
(ख) **शहाणा** मुलगा शाळेंत जातो.

४. (क) लाडू बाळाला दे.
(ख) **लहान** लाडू बाळाला दे.

ह्या वाक्यांपैकीं पहिल्या वाक्यांत गाय, दुसऱ्या वाक्यांत घोडा, तिसऱ्या वाक्यांत मुलगा व चौथ्या वाक्यांत लाडू, हे शब्द **नामें** आहेत; हें आपल्यास माहीतच आहे.

ह्या नामांच्या मागें आणखी एकेक शब्द आहे; तो काय काम करीत आहे, तें आपण शोधून पाहूं.

१. **काळी** गाय व्याली } (येथें 'काळी' हा शब्द गाय **कशी** हें ज्यास्त सांगण्यासाठीं आला आहे.)

२. **पांढरा** घोडा पळाला } (येथें 'पांढरा' हा शब्द घोडा **कसा** हें ज्यास्त सांगण्यासाठीं आला आहे.)

३. **शहाणा** मुलगा शाळेंत जातो } (येथें 'शहाणा' हा शब्द मुलगा **कसा** हें ज्यास्त सांगण्यासाठीं आला आहे.)

४. **लहान** लाडू बाळाला दे } (येथें 'लहान' हा शब्द लाडू **कसा** हें ज्यास्त सांगण्यासाठीं आला आहे.)

[ २ ]

आतां खालील वाक्यांमध्यें नामांच्या मागें आलेले शब्द काय काम करीत आहेत, तें पहा.

| | |
|---|---|
| १. **एक** आंबा खा | ४. **हजार** माणसें जत्रेंत होतीं |
| २. **दोन** पेरू मला दे | ५. **वीस** मुलें वर्गांत आहेत |
| ३. **शंभर** रुपये त्याला हवेत | ६. **सहा** बांकांवर त्यांस बसविलें |

ह्यांतील पहिल्या वाक्यांत आंबे **किती**?–एक; दुसऱ्या वाक्यांत पेरू **किती**?– दोन; तिसऱ्या वाक्यांत रुपये **किती**?–शंभर; चौथ्या वाक्यांत माणसें **किती**?– हजार; पांचव्या वाक्यांत मुलें **किती**?– वीस; व सहाव्या वाक्यांत बांक **किती**?–सहा; ह्याप्रमाणें नामांच्या मागें आलेले शब्द **किती** वस्तु हें सांगत आहेत.

म्हणजे नामें "**कशीं**" आहेत हें सांगणारे व नामें "**किती**" आहेत हें सांगणारे शब्द नामांच्या मागें येतात; असें आढळून येतें. हे शब्द नामांच्या बद्दल आपल्यास ज्यास्त माहिती देतात. नाम "कसें" आहे हें सांगणारे शब्द नामांचा गुण दाखवितात; व नाम "**किती**" आहे हें सांगणारे शब्द नामांची संख्या दाखवितात.

नामांचा गुण किंवा संख्या दाखविणाऱ्या ह्या शब्दांस "**विशेषण**" असें दुसरें नांव आहे.

   

या विचारावरून आपल्याला काय आढळून आलें बरें ?

**१. नामांचे गुण किंवा संख्या दाखविणारेही शब्द आपल्या बोलण्यांत येतात.**

**२. ह्या शब्दांवरून नामांची ज्यास्त माहिती आपल्यास कळते.**

**३. नामांच्या गुण किंवा संख्या दाखविणाऱ्या शब्दांस "विशेषण" असें म्हणतात.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. कोणत्या प्रकारच्या शब्दांवरून आपल्यास नामांची ज्यास्त माहिती कळते?

२. आंबा, कलिंगड, पोपट, मोर, कावळा, कोल्हा, कुत्रा, सिंह, हरिण, नाग, अजगर, द्रौपदी, कर्ण, दुःशासन, दुर्वास, हिमालय, गंगा, खुर्ची, दगड, कापूस, चंद्र, सूर्य, या नामांच्या गुणांचे सांगतां येतील तेवढे जास्त शब्द सांगा व तशीं रोज तीन तीन वाक्यें जुळवून लिहून आणा.

३. विशेषणें काय काम करितात? वाक्यांत तीं बहुधा कोठें येतात?

४. सुंदर, कुरूप, शूर, क्रूर, मित्रा, उदार, शहाणा, मूर्ख, विद्वान्, इ० शब्द तीन तीन नामांना लावून दाखवा.

५. खालील वाक्यांतील विशेषणें सांगा—

(१) बागेंतील झाडांना सुंदर फुलें आलीं आहेत. (२) ही पहिली तसबीर राजाची आहे व दुसरी राणीची आहे. (३) भाऊ, हे वाटोळे रंगीत चेंडू कशाला? (४) मी त्यांतले दोन चेंडू घेऊं का? (५) बाबांच्या अंगरख्याला दोन खिसे व रेशमी गोंडेदार बंद आहेत. (६) ते लाल पगडी घालितात. (७) तें वेडें कोंकरूं पळून मोठ्या मैदानांत गेलें व मग दाट जंगलांत शिरलें. (८) माझ्या उघड्या पाठीवर शंभर फटके मारा. (९) मला बाबांनीं एक सुंदर इंग्रजी बाजा आणिला आहे. (१०) हा लहानगा बाळ मला फार आवडतो. (११) त्याचे तांबूस पाय आहेत. (१२) त्याच्या कोमल अंगाला मी हात लावीत नाहीं.

---

# ६. सर्व नामांच्या बद्दल येणारे शब्द – सर्वनामें

[ १ ]

१. (अ) **मी** एकटा येणार नाहीं –(या वाक्यांत **मी** म्हणजे कोण ?)
   (आ) **आम्ही** सगळे येऊं –(यांत **आम्ही** म्हणजे कोण ?)
२. (अ) **तूं** पुस्तक फाडलेंस –(यांत **तूं** म्हणजे कोण ?)
   (आ) **तुम्हीं** रांगोळ्या घातल्यात–(येथें **तुम्हीं** म्हणजे कोण ?)

३. (अ) **तो** लुच्चा आहे
   (आ) **ती** आईला बोलते
   (इ) **तें** रडतें
   } (यांत **तो, ती, तें,** म्हणजे कोण ?)

   (अ) **हा** बटणांशिवाय आहे
   (आ) **ही** कोरी आहे
   (इ) **हें** अरुंद आहे
   } (यांत **हा, ही, हें,** म्हणजे काय ?)

४. (अ) **जो** अभ्यास करितो
   (आ) **जी** वाढते
   (इ) **जें** तुला आवडतें
   } (येथें **जो, जी, जें,** हे शब्द कोणासाठीं आले आहेत ?)

ह्या सर्व वाक्यांतून मी–आम्ही, तूं–तुम्ही, तो–ती–तें, हा–ही–हें, जो–जी–जें, म्हणजे कोण तें कांहीं नक्की कळत नाहीं.

[ २ ]

आतां खालीलप्रमाणें बोलल्यास कळतें कीं नाहीं, तें पाहूं:—

१. (अ) रामा म्हणतो,
   "**मी** एकटा जाणार नाहीं"
   } (येथें **मी** म्हणजे **रामा**)

| | |
|---|---|
| (आ) रामा म्हणतो, " **आम्ही** किंवा **आपण** जाऊं " | (येथें **आम्ही** किंवा **आपण** म्ह० **रामा, गोविंदा,** इ० **सर्व**) |
| २. (अ) गंगू, **तूं** चित्र फाडलेंस | (येथें **तूं** म्हणजे कोणीं ? '**गंगूनें**' असें कळतें) |
| (आ) मुलींनो, **तुम्हीं** सुंदर रांगोळ्या घातल्यात | (येथें **तुम्हीं** म्हणजे **मुलींनीं**) |
| (इ) दादासाहेब, **आपण** हें केलें | (येथें **आपण** म्ह० **दादासाहेब**) |
| ३. (अ) काल विनू आला होता, **तो** लुच्चा आहे | (येथें **तो** म्हणजे **विनू**) |
| (आ) गंगूच्या पायांत कांटा मोडला, म्हणून **ती** आईला बोलावते | (येथें **ती** म्हणजे **गंगू**, हें स्पष्ट आहे) |
| (इ) मूल आणलें पण **तें** रडतें | (यांत **तें** म्हणजे एक मूल) |

त्याचप्रमाणें—

| | |
|---|---|
| (अ) काल **कोट** घेतला, **हा** बटणांशिवाय आहे | (येथें **हा** म्हणजे **कोट.** कोट ह्या शब्दाबद्दल **हा** हा शब्द आला आहे) |
| (आ) मी **साडी** नेसतें, **ही** कोरी आहे | (यांत **ही** हा शब्द **साडी** या शब्दाबद्दल आला आहे) |
| (इ) **धोतर** पुरत नाहीं, **हें** अरुंद आहे | (येथें **हें** म्हणजे **धोतर.** धोतर ह्या शब्दाबद्दल **हें** हा शब्द आला आहे) |

४. (अ) **जो** अभ्यास करितो— (यांत **जो** म्हणजे **कोणीतरी मुलगा**)

(आ) **जी** पोळ्या करिते— (यांत **जी** म्ह० कोणीतरी **बाई**)

(इ) **जें** तुला आवडतें — (येथें **जें** म्हणजे **फूल**, **मूल**, **श्रीखंड**, **गांव**, **घर**, इ० कोणत्या तरी **नामाबद्दल** तो शब्द आला आहे)

ह्यावरून असें आढळून आलें कीं, मी–आम्ही, तूं–तुम्ही, आपण, तो–ती–तें, हा–ही–हें, जो–जी–जें, हे शब्द दुसऱ्या कोणत्या तरी **नामांच्याबद्दल** येतात.

[ ३ ]

असेच आणखी शब्दः—

५. (अ) तेथें **कोण** आहे? — (यांत **कोण** म्हणजे एकादा **मनुष्य**, **प्राणी**, **जनावर**, यांबद्दल तो शब्द आला आहे)

(आ) तें **काय** पडलें आहे? — (यांत **काय** म्ह० कोणती तरी **वस्तु**. तिच्याबद्दल हा शब्द आला आहे)

६. (अ) रामानें पुस्तक दिलें व **आपण** निघून गेला — (यांत **आपण** म्हणजे **रामा**. म्हणून **आपण** हा शब्द रामा-बद्दलच आला आहे)

(आ) रामानें **स्वतःचें** घर मोडिलें — (यांत **स्वतःचें** म्हणजे **रामाचें**. म्हणून **स्वतःचें** हा शब्दही रामाबद्दलच आला आहे)

ह्याप्रमाणें **कोण, काय, आपण** व **स्वतः** हेही शब्द वरच्या-सारखेच कोणत्या तरी **नामांच्याबद्दल** येतात; असें आपणांस समजून आलें.

---

## ७. सर्व नामांच्या बद्दल येणारे शब्द – सर्वनामें

[ १ ]

आपण मागील पाठांतील शब्दांविषयीं आणखी ज्यास्त विचार करूं या.

| | |
|---|---|
| १. मला **हें** आवडत नाहीं | (येथें हें म्हणजे **श्रीखंड**, कीं **घोडें**, कीं **कुत्रें**, कीं **बोलणें**; काय समजावयाचें ?) |
| २. **तो** सुन्दर आहे | (यांत **तो** म्हणजे कोण ? तो **पुरुष** कीं, तो **घोडा**, कीं **बैल**, कीं **चौरंग** ?) |
| ३. **मी** सिंहगडला जाणार | (येथें **मी** म्हणजे कोण ? **दादा**, **बाबा**, **आई**, **ताई**; काय समजावयाचें ?) |
| ४. **तूं** बोलूं नको | (यांत **तूं** म्हणजे **रामा**, कीं **गोविंदा**, कीं **काशी**, कीं **सुंदरी**?) |

ह्यावरून असें आढळून येतें कीं, हे मागील पाठांतील शब्द **मी, तूं, तो, हा, जो, कोण, काय, आपण, स्वतः**, हे एकाच ठराविक

नामाच्या बद्दल येतात असें नाहीं; तर ज्यावेळीं ज्या नामाच्या संबंधानें बोलणें चाललें असेल, त्यावेळीं ते त्या नामाबद्दल येतात; **सर्व नामांबद्दल** ते येऊं शकतात.

[ २ ]

| [ आपण असें बोलतों ] | [ असें बोलत नाहीं ] |
|---|---|
| (१) रामा म्हणाला कीं,— **मला** आज भूक नाहीं. | (१) रामा म्हणाला कीं,— 'रामाला' आज भूक नाहीं. |
| (२) लांडगा उत्तर करितो,— तूं नाहीं तर **तुझ्या बापानें** शिव्या दिल्या असतील. | (२) लांडगा उत्तर करितो,— 'करडानें' नाहीं तर 'करडाच्या बापानें' शिव्या दिल्या असतील. |
| (३) गंगू **आपण** फूल तोडलेलें, सांगत नाहीं. | (४) गंगू, 'गंगूनें' फूल तोडलेलें सांगत नाहीं. |

ह्यावरूनही नामांचे तेच तेच शब्द पुनः बोलायला लागून, ऐकतांना ते लांबट व कंटाळवाणे वाटूं नयेत, म्हणून **सगळ्या नांवांच्याबद्दल** ( सर्व नामांबद्दल ) हे शब्द येतात; असें झालें. यामुळें या शब्दांना "**सर्वनाम**" असें म्हणणें शोभेल.

× × × ×

एकंदरींत आज आपण काय मिळविलें ?

**१. आपल्या बोलण्यांत सर्व नामांच्याबद्दल येणारेही शब्द असतात.**

**२. मी, तूं, तो, हा, जो, कोण, काय, आपण व स्वतः, असे हे सर्व नामांच्याबद्दल येणारे शब्द दिसतात.**

**३. सर्व नामांच्याबद्दल येणाऱ्या शब्दांना "सर्वनाम" म्हणतात.**

## प्रश्न व गृहपाठ

१. नामांबद्दल येणारे शब्द 'सर्व नामांबद्दल येऊं शकतात' हें कसें, तें सांगा.

२. नामांबद्दल येणाऱ्या शब्दांचा उपयोग काय ?

३. नामांच्या बद्दल येणारे आपल्या भाषेंतले कांहीं शब्द सांगा.

४. **मी** व **आम्ही** हे शब्द येतील अशीं पांच वाक्यें तयार करा व त्यांत ते शब्द कोणत्या नामांबद्दल आले आहेत तें सांगा.

५. **तूं** व **तुम्ही** हे शब्द वाक्यांत आणून, ते कोणत्या नामांबद्दल त्या ठिकाणीं आले आहेत, तें सांगा.

६ **तो, हा, जो,** हे शब्द वाक्यांत योजून दोन दोन वाक्यें लिहून आणा.

७. **कोण, काय, आपण** व **स्वतः** हे शब्द वाक्यांत योजून दाखवा.

८. खालील गोष्टींतील सर्वनामें ओळखा—

"आई, आज मी भातुकली खेळतें. तूं मला भातुकलीला काय देशील ? मी गंगूला व माईला बोलावतें. आम्ही अंगण्यांत खेळूं. बंडूला मी बोलावूं नकोना ? तो द्वाड आहे. त्यानें परवां आम्हांला उगीच मारिलें. गंपू, माई, तुम्ही आलांतच कारे ? मी तुम्हांला बोलवायलाच येणार होतें. अरे, पण ही कोण ? ही तर इंदू मावशी. आणि तिच्या कडेवर हा कोण ? हा छबुकडा बाळू. मावशी, त्याच्या हातांत ग काय ? बाहुली का ? चला, आपण हिचें लगीन करूं."

९. खालील गोष्टींत जेथें सर्वनामें हवीं असतील तेथें तीं घालून गोष्ट घरून लिहून आणा.

शेख महंमद म्हणून एक आळशी मनुष्य होता. शेख महंमदाचा बाप जिवंत असतां शेख महंमदानें कांहीं उद्योग केला नाहीं. शेख महंमदाचा बाप मेल्यावर शेख महंमदानें कांहीं कांचेचीं भांडीं खरेदी करून दुकान थाटलें. दुकानाची जागा लहानच होती. लोडाशीं टेकून दुकानांत शेख महंमद बसला असतां शेख महंमद स्वतःशीं म्हणाला, "शेख महंमद हीं भांडीं विकून श्रीमंत होईल. शेख महंमदाला अमीराची मुलगी मिळेल. शेख महंमद म्हणेल, शेख महंमद बायकोशीं बोलणार नाहीं. शेख महंमद बायकोला लाथ मारील."

---

# ८. क्रियांच्या गुणांचे शब्द – क्रियाविशेषणें

[ १ ]

| | |
|---|---|
| १. **आज** सुटी आहे | ४. मी **उशीरां** जेवतों |
| २. **उद्यां** शाळा भरेल | ५. **आतां** थंडी आहे |
| ३. **काल** बाबा गेले | ६. **मग** ऊन पडेल |

ह्या वाक्यांतील जाड अक्षरांतले शब्द काय काम करीत आहेत बरें ?

१. यांत सुटी आहे **केव्हां** हें "आज" ह्या शब्दावरून कळत आहे.

२. यांत शाळा भरेल **केव्हां** हें "उद्यां" ह्या शब्दावरून कळत आहे.

३. यांत बाबा गेले **केव्हां** हें "काल" ह्या शब्दावरून कळत आहे.

४. यांत मी जेवतों **केव्हां** हें "उशीरां" ह्या शब्दावरून कळत आहे.

५. यांत थंडी आहे **केव्हां** हें "आतां" ह्या शब्दावरून कळत आहे.

६. यांत ऊन पडेल **केव्हां** हें "मग" ह्या शब्दावरून कळत आहे.

ह्याप्रमाणें क्रिया **केव्हां** होत आहे, हें सांगणारेही शब्द वाक्यांत आढळतात; असें दिसून येतें.

[ २ ]

आतां खालील जाड अक्षरांतील शब्दांचें काय काम आहे, तें पहा.

| | |
|---|---|
| १. **येथें** बस | २. **तेथें** बसूं नको |
| ३. **इकडे** या | ४. **तिकडे** जाऊं नका |
| ५. **दूर** सरका | ६. **मागें** बसा |

१. यांत बस **कोठें** हें "येथें" ह्या शब्दावरून कळत आहे.
२. यांत बसूं नको **कोठें** हें "तेथें" ह्या शब्दावरून कळत आहे.
३. यांत या **कोठें** हें "इकडे" ह्या शब्दावरून कळत आहे.
४. यांत जाऊं नका **कोठें** हें "तिकडे" ह्या शब्दावरून कळत आहे.
५. यांत सरका **कोठें** हें "दूर" ह्या शब्दावरून कळत आहे.
६. यांत बसा **कोठें** हें "मागें" ह्या शब्दावरून कळत आहे.

ह्याप्रमाणें क्रिया **कोठें** होत आहे, हें सांगणारे शब्द वाक्यांत आढळतात.

[ ३ ]

आतां खालील वाक्यें पहा:—

१. **हळू** बोल. या वाक्यांत बोल **कसें**?—"हळू".
२. **पटकन** ऊठ. या वाक्यांत ऊठ **कसें**?—"पटकन".
३. **लौकर** चल. या वाक्यांत चल **कसें**?—"लौकर".
४. **मुद्दाम** बोलाव. या वाक्यांत बोलाव **कसें**?—"मुद्दाम".

ह्याप्रमाणें वरील ठळक शब्दांवरून क्रिया **कशी** होत आहे, तें कळत आहे. तसेंच—

१. **येतां जातां** दुधाकडे पहा. **केव्हां**?–" येतां जातां ".
२. शाळेंत **जातांना** वाटेंत खेळूं नये. **केव्हां**?–" जातांना ".
३. मी **निरखून** पाहतों. **कसा**?–" निरखून ".
४. तो **वाकून** चालतो. **कसा**?–" वाकून ".
५. त्याला **वाजत गाजत** आणा. **कसा**?–" वाजत गाजत ".
६. रामा **अडखळत** बोलतो. **कसा**?–" अडखळत ".

ह्या वाक्यांतील ठळक शब्दांवरूनही क्रिया **केव्हां** व **कशी** होत आहे, तें कळत आहे.

यावरून हे क्रियेची ज्यास्त माहिती सांगणारे शब्द—" क्रिया " **केव्हां** होते, **कुठें** होते, **कशी** होते,—हें सांगण्यासाठीं वाक्यांत येतात; हें सांगणें त्यांचें काम आहे; असें झालें.

म्हणजे ज्याप्रमाणें नामें **कशीं** आहेत हें सांगणारे शब्द नामांची ज्यास्त माहिती देतात किंवा **गुण** दाखवितात, असें आपण मागें पाहिलें; त्याप्रमाणेंच हे वरील शब्द **क्रियेची** ज्यास्त माहिती देतात किंवा **गुण** दाखवितात; म्हणून यांना " **क्रियाविशेषणें** " किंवा " **क्रियाविशेषण अव्ययें** " असें म्हणतात.

   

ह्या शोधण्यावरून अखेर आपणांस काय सांपडलें बरें ?

**१. आपल्या बोलण्यांत क्रियेच्या गुणांचेही शब्द येतात.**

**२. क्रियेच्या गुणांचे शब्द म्हणजे क्रिया ' केव्हां झाली,' ' कुठें झाली,' ' कशी झाली,' इ० सांगणारे शब्द होत.**

**३. क्रियेच्या गुण दाखविणाऱ्या शब्दांस " क्रियाविशेषण अव्ययें " असें म्हणतात.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. 'क्रिये' चा **गुण** दाखविणें म्हणजे काय ?

२. येथें, तेथें, इकडे, तिकडे, असे **ठिकाण** दाखविणारे 'क्रिये'च्या गुणांचे शब्द येतील, अशीं पांच-सहा वाक्यें लिहून आणा.

३. एव्हां, जेव्हां, आज, उद्यां, असे **वेळ** दाखविणारे 'क्रिये'च्या गुणांचे शब्द येतील, अशीं पांच-सहा वाक्यें सांगा.

४. करून, जाऊन; येतां, जातां; बसत, उठत; इ० **वेळ व रीत** दाखविणारे 'क्रिये' च्या गुणांचे प्रत्येकीं तीन तीन शब्द वाक्यांत योजून दाखवा.

५. हळू, लौकर, पटकन, पटापट, चटाचट, चारदां, दहादां, जों, तों, नीट, दररोज, हीं क्रियाविशेषण अव्ययें घालून एकेक चांगलें वाक्य बनवा.

६. खालील वाक्यांतील "**क्रियाविशेषण अव्ययें**" ओळखाः—

(१) पुढें माझी प्रकृति हळू हळू सुधारली. (२) नानाची मात्र पुनः सुधारली नाहीं. (३) जेव्हां ढग येतात तेव्हां फार उकडतें. (४) मग महाराजांस अभिषेक झाला. (५) आज सुटी आहे. (६) उद्यां शाळेस जायचें. (७) मी आंत जातों. (८) तुम्ही येथें बाहेरच बसा. (९) इकडे तिकडे हिंडवून बाळाला निजव. (१०) मागें येथें राजवाडा होता. (११) आतां नाहीं. (१२) हंसत काम करावें. (१३) मग तें रडत भोगावें. (१४) निजतांना देवाचें स्मरण करावें. (१५) तो उड्या मारीत चालतो. (१६) मी जेवून आलों. (१७) तो कोल्हा उड्या मारून दमला.

७. पुढील वाक्यांत एक एक **क्रियाविशेषण अव्यय** घालाः—

(१) रामा ×× जेवतो. (२) गोविंदा ×× पळतो. (३) तो ×× आला. (४) पक्षी ×× उडतो. (५) चेंडू ×× उडाला.

---

# ९. दोन शब्द किंवा दोन वाक्यें यांमध्यें येणारे शब्द—उभयान्वयी

[ १ ]

१. [ १ ] वारा आला **आणि** [ २ ] पाऊस गेला

२. [ १ ] मी येईन **किंवा** [ २ ] गणूभाऊही येतील

आगगाडीचे डबे एकमेकांशीं कशा रीतीनें जोडितात बरें ? त्या प्रत्येक दोन डब्यांच्या मध्यें त्यांना जोडणारी साखळी किंवा दुव्वा असतो.

अगदीं हुबेहूब याचसारखा प्रकार वरच्या दोन दोन वाक्यांचा दिसत नाहीं काय ?

( १ ) " वारा आला " आणि ( २ ) " पाऊस गेला;" हीं दोन वाक्यें " **आणि** " ह्या मधल्या दुव्यानें एकमेकांस जोडिलीं आहेत; व त्यामुळेंच त्या वाक्यांचा संबंध जुळून एकच गोष्ट झाली नसून दोन झाल्या; असा त्या दोन्ही वाक्यांमिळून अर्थ कळत आहे.

" वारा आला आणि ...." एवढें म्हटलें कीं, लगेच पुढें एखादें वाक्य आहे, हें तेव्हांच कळतें. त्याचप्रमाणें ".... आणि पाऊस गेला " एवढें म्हटलें कीं, लगेच मागें एक वाक्य आहे, हें सहज ध्यानांत येतें. म्हणजे यांच्या मधला " **आणि** " हा शब्द त्या दोन वाक्यांची सांगड घालीत आहे, असें झालें.

( १ ) " मी येईन " ( २ ) " गणूभाऊही येतील; " हीं दोन वाक्यें " **किंवा** " ह्या मधल्या दुव्याप्रमाणें असणाऱ्या शब्दानें एकमेकांस जोडिलीं आहेत; व तेथेंही पहिल्या वाक्याचा दुसऱ्या वाक्याशीं संबंध जोडला गेला आहे.

" मी येईन किंवा...." एवढें म्हटलें कीं, लगेच त्याच्या पुढें एकादें वाक्य आहे, हें ध्यानांत येतें. त्याचप्रमाणें "....किंवा गणूभाऊही येतील" एवढें म्हटल्यानें त्याच्या मागें एक वाक्य आहे, हें स्पष्ट कळतें. या दोन वाक्यांचा संबंध येथें " **किंवा** " ह्या शब्दानें जोडलेला आहे.

[ २ ]

१. [ १ ] वसंत **व** [ २ ] कमल हीं शाळेंत गेलीं.

२. [ १ ] रामा **आणि** [ २ ] गोविंदा हे मुंबईहून आले.

३. [ १ ] गंगू **व** [ २ ] यमू ह्या बहिणी होत.

यांतील पहिल्या वाक्यांत (१) "वसंत" (२) "कमल" यांमधील "व" हा दुव्याप्रमाणें असणारा शब्द त्या दोन शब्दांच्या मध्यें आलेला आहे.

"वसंत व...." एवढें म्हटल्यानें लगेच त्याच्या पुढें एकादा शब्द आहे, हें ध्यानांत येतें. त्याचप्रमाणें "....व कमल" असें म्हटल्याबरोबर त्याच्या मागें एकादा शब्द आहे, हें स्पष्ट कळतें, या दोन् शब्दांच्या मध्यें "व" हा शब्द आलेला आहे.

अशाच रीतीनें रामा **आणि** गोविंदा हे मुंबईहून आले; गंगू **व** यमू ह्या बहिणी होत; या ठिकाणीं 'आणि', 'व', यांनीं दोन शब्द जोडले आहेत.

[ ३ ]

त्याचप्रमाणें—

| | | |
|---|---|---|
| १. अभ्यास केला | **पण** | पास झालों नाहीं. |
| २. तुजकडे यावें | **परंतु** | तूं फार दूर आहेस. |
| ३. तुला संत्रें हवींत | **कीं** | डाळिंबें हवींत ? |
| ४. रामाला पाठवा | **अथवा** | गोविंदाला पाठवा. |
| ५. तुला लिंबाचें सरबत हवें | **किंवा** | चहाच हवा ? |
| ६. वेळेवर आली नाहींस | **म्हणून** | गाडी चुकली. |
| ७. भक्ति करशील | **तर** | देव पावेल. |
| ८. चार पैसे दिले | **म्हणजे** | एक आणा मिळतो. |
| ९. तुझ्यावर विश्वास नाहीं | **कारण** | तूं लुच्चा आहेस. |

ह्या वरच्या प्रत्येक दोन वाक्यांमध्यें देखील मोठ्या अक्षरांत छापलेले

जे शब्द आले आहेत, ते वरच्या वाक्यांतल्या दुव्यांसारखेच दिसतात; ते त्यांच्याप्रमाणेंच दोन वाक्यांचा संबंध जोडून देणारे " मध्यस्थ " शब्दच आहेत; असें स्पष्ट घ्यानांत येतें. यांनाच " **उभयान्वयी** " शब्द किंवा " **उभयान्वयी अव्ययें** " असें दुसरें नांव आहे.

   

आज आपण काय हुडकिलें ?

**१. आपल्या बोलण्यांत दोन शब्द किंवा दोन वाक्यें यांमध्यें, त्यांचा संबंध जोडणारे कांहीं शब्द येतात.**

**२. दोन शब्द किंवा दोन वाक्यें यांचा संबंध जोडण्यासाठीं त्यांमध्यें येणाऱ्या शब्दांना " उभयान्वयी अव्ययें " असें म्हणतात. ( हे शब्द कधींही क्रियेचा गुण दाखवीत नाहींत )**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. दोन वाक्यांच्या मध्यें येणाऱ्या शब्दांचें काम काय ?

२. आणि, अथवा, पण, किंवा, म्हणजे, जर, तर, परन्तु, कीं, हे शब्द दोन वाक्यांमध्यें घालून, प्रत्येकाचीं तीन तीन उदाहरणें घरून लिहून आणा.

३. खालील वाक्यांतील " **उभयान्वयी अव्ययें** " ओळखा—

(१) मी खडूचा लहानसा तुकडा आहें आणि माझें मोलही थोडेंच आहे; तरी वर्गांत शिकवितेवेळीं माझ्यावांचून फार अडतें. ( २ ) मला तुम्ही दररोज पाहतां, पण मी कोठून आलों बरें ? ( ३ ) चुनखडी व शिंपल्या यांपासूनच मी तयार होतों. ( ४ ) शिंपल्या भाजल्या म्हणजे मी ठिसूळ होतों; म्हणून तुम्ही मला सहज फोडतां. ( ५ ) जर मला भाजलें नाहीं, तर मी तुम्हांस फुटणार नाहीं. ( ६ ) कोळसे किंवा लांकडें यांची भट्टी पेटवून मला भाजतात.

४. " रामा **आणि** गोविंदा यांना बोलाव " येथें **उभयान्वयी अव्यय** कशांमध्यें आलें आहे ? अशीं आणखी तीन-चार उदाहरणें सांगा.

---

# १०. अन्य शब्दांना जोडून येणारे शब्द-शब्दयोगी

[ १ ]

**१. मीं गोविंदाकडून द्राक्षें आणविलीं.**

ह्यांतील 'गोविंदाकडून' ह्या शब्दांत **गोविंदा** हा एक शब्द दिसत आहे व **कडून** हा दुसरा एक शब्द दिसत आहे.

**२. सीतेपेक्षां सावित्री अधिक सुन्दर होती.**

ह्यांत 'सीतेपेक्षां' ह्या शब्दांत **सीता** हा एक शब्द दिसतो; व **पेक्षां** हा दुसरा एक शब्द दिसतो.

**३. सुमनजवळ एक फुलांचा हार आहे.**

ह्यांत 'सुमनजवळ' ह्या शब्दांत **सुमन** व **जवळ** असे दोन शब्द आढळतात.

**४. पानिपतामध्यें दोन मोतीं गळून गेलीं.**

ह्या ठिकाणीं 'पानिपतामध्यें' ह्या शब्दांत **पानिपत** हा एक शब्द व **मध्यें** हा दुसरा शब्द दिसतो.

जर हे दोन शब्द आहेत, तर ते इतर शब्दांप्रमाणें सुटे न येतां एकत्र कां बरें आले आहेत ? ते काय काम करितात ? जसे आपल्या बोलण्यांतले निरनिराळे काम करणारे शब्द आपण शोधून काढले, त्याचप्रमाणें ह्यांच्याबद्दलही आपण विचार करूं या.

[ २ ]

| | |
|---|---|
| (१) '**कडून**' द्राक्षें आणविलीं | ह्या वाक्यांचा कांहीं नीटसा अर्थ होतो काय ? वरचीं वाक्यें आणि हीं वाक्यें यांच्या अर्थांत काय कमीपणा वाटतो बरें ? |
| (२) '**पेक्षां**' अधिक सुन्दर होती | |
| (३) '**जवळ**' फुलांचा हार आहे | |
| (४) '**मध्यें**' दोन मोतीं गळून गेलीं | |

असें स्पष्टपणें कळतें कीं, वरच्या वाक्यांतले गोविंदा, सीता, सुमन व पानिपत हे शब्द या वाक्यांतून नसल्यानें त्या शब्दांचा "आणविलीं," "होती," "आहे," व "गळून गेलीं," यांच्याशीं जो संबंध वरच्या वाक्यांत आहे तो कांहींच कळत नाहीं; वरच्या वाक्यांप्रमाणें येथें स्पष्ट अर्थही होत नाहीं; त्यांत कमीपणा वाटतो; तो अर्थ व त्या शब्दांचा दुसऱ्या शब्दांशीं संबंध कळण्यास हवा असल्यास गोविंदाकडून, सीतेपेक्षां, सुमनजवळ व पानिपतामध्यें असे शब्द हवेत. कोणाकडून, कोणापेक्षां, कोणाजवळ, कशामध्यें, हें सांगणारे शब्द नसतील, तर नुसत्या **कडून, पेक्षां, जवळ, मध्यें,** ह्या शब्दांची अवस्था पांगळ्याप्रमाणें होईल; म्हणजे मूल जसें आई-बापांना धरून चालतें, त्याप्रमाणें हे शब्द त्या मुख्य शब्दांना धरून जुळून चालतात असें दिसतें; आणि म्हणूनच हे शब्द त्यांना जुळून लिहीत असावेत.

एवढ्या विचारावरून असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, **कडून, पेक्षां, मध्यें, जवळ, पासून, वर, खालीं, करितां, साठीं, मुळें,** इ० शब्द दुसऱ्या नामांच्या शब्दांस जोडल्यानेंच त्या नामांचा दुसऱ्या शब्दाशीं असलेला खरा संबंध कळतो; आणि योग्य व आपल्याला हवा तो अर्थ उत्पन्न होतो; आणि ते सुटे बोलल्यानें अर्थ नीटसा वाटत नाहीं व तें बोलणें कानांलाही

चमत्कारिक लागतें; म्हणून हे शब्द सुटे लिहिण्याची आपली रीत पडली नसावी; ते दुसऱ्या शब्दाला जोडूनच लिहितात; यामुळें यांना "**शब्दयोगी अव्ययें**" असें म्हणतात. शब्दयोगी अव्यय जर गाळलें, तर वाक्याचा पुरा अर्थ होत नाहीं. जसें 'गोविंदा....द्राक्षें आणविलीं,' 'सीते.... सावित्री अधिक सुंदर होती,' या वाक्यांचा कांहींच अर्थ होणार नाहीं.

[ ३ ]

(१) तो माडी**वर** आहे
(२) मी झाडा**खालीं** बसलों
(३) तोंड धुण्या**पूर्वीं** जेवूं नये
(४) वानरा**मागें** वानर पळाले

[यांत वर, खालीं, पूर्वीं, मागें, हे शब्द गाळले, तर वाक्याचा पुरा अर्थ होत नाहीं व ते दुसऱ्या शब्दाला जुळून येणारे आहेत म्हणून त्यांना "**शब्दयोगी**" असें नांव देतां येईल.]

(१) त्यानें हात 'वर' केले
(२) तूं वरून 'खालीं' ये
(३) 'पूर्वीं' राम होऊन गेला
(४) 'मागें' वानर फार होते

[यांत वर, खालीं, पूर्वीं, मागें, हे शब्द क्रियांच्या गुणांचे म्ह० "क्रियाविशेषणें" आहेत व ते गाळले तरी वाक्याचा अर्थ पुरा होतो म्हणून ते शब्दयोगी अव्ययें नाहींत.]

विचार केल्यास हा फरक आपल्यास आढळून येईल.

   

यावरून असें दिसतें कीं;—

**१. आपल्या बोलण्यांत दुसऱ्या शब्दांना जोडून येऊन, त्यांचा अन्य शब्दांशीं संबंध जोडणारेही कांहीं शब्द असतात.**

**२. दुसऱ्या शब्दांना जोडून येऊन त्यांचा अन्य शब्दांशीं संबंध जोडणाऱ्या शब्दांना "शब्दयोगी अव्ययें" असें म्हणतात.**

**३. हे शब्द गाळले, तर वाक्याचा अर्थ नीट होत नाहीं.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. दुसऱ्या शब्दांना जोडून येणारे शब्द कोणते? ते कोणत्या शब्दांना विशेषतः जुळून येतात?

२. दुसऱ्या शब्दांना जोडून येणारे शब्द काय काम करितात? वाण्या**कडील** साखर, घोड्या**वर** बसला, रामा**पेक्षां** उंच मनी, दिव्या**मध्यें** तेल आहे, यांतील **शब्दयोगी अव्ययें** कोणकोणत्या शब्दांचा संबंध दाखवितात ?

३. वर, खालीं, इ० शब्द दुसऱ्या शब्दांना जोडून केव्हां येतात व ते क्रियाविशेषण अव्ययें केव्हां असतात ?

४. पुढील **शब्दयोगी अव्ययां**पैकीं एक एक शब्द घेऊन वाक्य बनवाः—
पुढें, मागें, मध्यें, करितां, पासून, बद्दल, साठीं, कडून.

५. कांहीं **शब्दयोगी अव्ययें** मागल्या शब्दाला न बदलणारीं आहेत काय? कोणतीं ?

६. खालील वाक्यांतील **शब्दयोगी अव्ययें** ओळखा—

( १ ) शिवा कांहीं कामाकरितां दुसऱ्या गांवीं गेला. ( २ ) ओढ्याच्या कांठीं झाडाखालीं तो विसावा घेण्यासाठीं बसला. ( ३ ) इतक्यांत त्याजपुढें एक सुंदर गाडी आली. ( ४ ) तिच्यामध्यें एक श्रीमंत गृहस्थ होता. ( ५ ) त्याच्या अंगावर उंची पोषाख होता. ( ६ ) गळ्यामध्यें एक टपोऱ्या मोत्यांची माळ होती. ( ७ ) पण गाडीमधून त्याला उतरतां येईना. ( ८ ) नोकरांकडूनच त्यानें आपल्यास उतरवून घेतलें. ( ९ ) शिवा म्हणाला, ह्या श्रीमंतीपेक्षां गरिबीच बरी.

७. पुढील वाक्यांत नामापुढें योग्य **शब्दयोगी अव्यय** घाला व तीं वाक्यें पुन्हां लिहून दाखवा—

(१) दगडा×× विंचू आहे. (२) वर्गा×× मुलें आहेत. (३) झाडा×× पक्षी आहे. (४) पिशवी×× रुपये आहेत. (५) गोविंदा रामा×× उंच आहे.

---

# ११. मनाचा विकार दाखविणारे शब्द–उद्गारवाचक

आपल्या बोलण्यांत कोणकोणत्या प्रकारचे शब्द येतात, हें आपण शोधून पाहिलें. आतां आणखी एकादा प्रकार आढळतो कीं काय, तें पाहूं.

(अ) आपल्याला खूपच खूप आंबे दिसले किंवा दुसऱ्या कांहीं पुष्कळच पुष्कळ वस्तु दिसल्या म्हणजे आपण म्हणतों—

**अबब !** किती हे आंबे ? **ओहोहो !** किती ह्या वस्तु ?

(आ) परीक्षा पास झाल्याचें कळलें कीं, आपल्या तोंडांतून एकदम निघतें—

**शाबास ! वाहवा ! ठीक ! उत्तम ! भले !**

(इ) एकाद्याचें कोणी माणूस मृत्यु पावल्याचें किंवा एकाद्याची परीक्षा नापास झाल्याचें कळलें, तर लगेच आपण उद्गारतों—

**अरेरे !** वाईट झालें !

(ई) दुखण्यांत विव्हळतांना आपोआप आपल्या तोंडांतून बाहेर पडत असतें कीं—

**आई ! अयाई ! देवारे ! अग ! आई ग !**

(उ) आपणास एकादी गोष्ट नको असली, किंवा योग्य वाटत नसली, तर आपण लगेच म्हणतों कीं—

**छे ! छट् ! इश्श ! अं: !**

याप्रमाणें आपल्या तोंडांतून एकदम शब्द बाहेर पडतात. आपल्याला जें काय वाटतें, तें "**अबब ! अरेरे ! छे !**" अशा शब्दांनीं

एकदम बाहेर पडतें; म्हणजे आपल्या मनावर एकदम एकाद्या गोष्टीनें जो परिणाम होतो तो लगेच प्रकट होतो. असा मनावरचा परिणाम दाखविणारे हे शब्द आहेत. मनावरचा परिणाम एकदम ह्या शब्दांनीं म्हणजे ह्या उद्गारांनीं बाहेर पडतो, म्हणून यांना "**उद्गारवाचक**" शब्द किंवा "**उद्गारवाचक अव्ययें**" असें नांव आहे. हीं अव्ययें गाळलीं, तरी वाक्याचा अर्थ तसाच राहतो. जसें—

"अहाहा ! हे आंबे फार गोड आहेत" किंवा "हे आंबे फार गोड आहेत" या दोन वाक्यांतील अर्थांत फरक नाहीं. या अव्ययांचा वाक्यांतील दुसऱ्या कोणत्याही शब्दाशीं संबंध नसतो; तीं केवळ स्वतंत्रपणें उपयोगांत येतात; म्हणून त्यांस "**केवलप्रयोगी अव्ययें**" असेंही म्हणतात.

   

एवढ्यावरून आपल्यास काय कळलें ?

**१. आपल्या बोलण्यांत हर्ष, शोक, आश्चर्य, इत्यादि मनाचे विकार किंवा उद्गार दर्शविणारेही कांहीं शब्द येतात; त्यांना "उद्गारवाचक अव्ययें" अथवा "केवलप्रयोगी अव्ययें" असें म्हणतात.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. आनंद झाला असतां एकदम तोंडांतून कोणते शब्द बाहेर पडतात ? ते शब्द असलेलीं पांच वाक्यें लिहून आणा.

२. दुःख व आश्चर्य हे परिणाम मनावर घडले असतां, एकदम कोणते उद्गार बाहेर पडतात ? त्यांचीं तीन तीन वाक्यें सांगा.

३. **अरे, अगे, अहो,** हे शब्द वाक्यांत काय काम करितात ? हे शब्द कशा प्रकारचे आहेत ? कां ?

४. खालील वाक्यांतील **उद्गारवाचक अव्ययें** कोणतीं तीं सांगाः—

( १ ) अरेरे ! गरीब बिचारा अंबाराम ! ( २ ) वाहवा ! पहिला नंबर आला, आणखी काय हवें ? ( ३ ) इश्श ! मला नाहीं असलीं मानभावी बोलणीं खपायचीं ! ( ४ ) देवारे ! आतां काय करूं ? ( ५ ) छेः ! मी तुला माझी बाहुली देणार नाहीं. ( ६ ) ओहोहो ! गोविंदराव, तुम्हांला ही पगडी छान दिसते कीं हो ! (७) अबब ! किती खेळणीं आणलींस हीं !

---

# आपलें बोलणें



[ चौथ्या इयत्तेकरितां ]

## १. नामांचें भेद–१

**नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियापद, क्रियाविशेषण अव्यय, उभयान्वयी अव्यय, शब्दयोगी अव्यय व केवलप्रयोगी अव्यय,** अशा शब्दांच्या आठ जाति आपल्यास माहीतच आहेत; आतां त्यांपैकीं प्रत्येकामध्यें आणखी कांहीं निरनिराळेपणा सांपडतो कीं काय, तें पाहूं.

| [ १ ] | [ २ ] | [ १ ] | [ २ ] |
|---|---|---|---|
| रामा | मुलगा | तांबू | गाय |
| गंगू | मुलगी | मोत्या | कुत्रा |
| हरिश्चंद्र | राजा | मनी | मांजरी |
| तारामती | राणी | हिमालय | पर्वत |
| प्रल्हाद | भक्त | गंगा | नदी |

हे वरचे सर्व नांवांचे शब्द म्हणजे **नामें** आहेत; ह्यांतील पहिले शब्द व दुसरे शब्द ह्यांमध्यें काय बरें फरक आढळतो ?

असें दिसतें कीं, पहिले शब्द 'एकट्या एकट्याचीं' च नांवें आहेत, व दुसरे शब्द तशा 'अनेकांना लागू पडणारीं' म्हणजे सबंध त्या त्या वर्गाचीं किंवा जातीचीं नांवें आहेत; म्हणजे **रामा** म्हटला कीं ठराविक एकटा मुलगाच कळतो; पण नुसतें 'मुलगा' असें म्हटलें तर एकटा रामाच आपल्या डोळ्यांपुढें उभा राहत नाहीं, तर त्याच्यासारखे अनेक आपल्या डोळ्यांपुढें उभे राहतात; तो सर्व वर्गच आपल्या मनामध्यें येतो. **हरिश्चंद्र** म्हटलें तर आपल्या मनांत तो एकटाच राजा येतो; पण नुसतें 'राजा' म्हटलें, तर त्या हरिश्चंद्रासारखे जे कोणी असतील ते सर्व ध्यानांत येतात; तो सबंध वर्गच आपल्या मनामध्यें येतो.

त्याचप्रमाणें **हिमालय** ह्या शब्दानें नक्की त्या ठराविक एका पर्वताचाच आपल्यास बोध होतो; पण 'पर्वत' ह्या शब्दानें त्या हिमालयासारखे अनेक आपल्या डोळ्यांपुढें उभे राहतात; त्यांचा सर्व वर्गच डोळ्यांपुढें येतो; त्या सर्व वर्गाचा मनाला बोध होतो. अशाच रीतीनें **तांबू** म्हटलें तर एकटीच त्या ठराविक नांवाची गाय कळते; सर्वच गाईंचा त्यावरून बोध होत नाहीं; पण नुसतें 'गाय' म्हटलें तर मात्र ठराविक नांवाची एकादीच गाय आपल्या मनांत न येतां, तिच्यासारख्या सर्वच आपल्या डोळ्यांपुढें उभ्या राहतात; त्यांचा सबंध वर्ग किंवा सबंध जात आपल्यास कळते.

यावरून असें दिसतें कीं, (१) कांहीं नांवें ठराविक अशा **एकट्याच वस्तूला** किंवा **एकट्याच प्राण्याला** विशेषेंकरून लागू पडणारीं आढळतात म्हणून आपण त्यांना "**विशेषनामें**" असें

म्हणूं; व (२) कांहीं नांवें सामान्यतः एकाच सारख्या अशा **अनेक वस्तूंना** किंवा **अनेक प्राण्यांना** म्हणजे त्यांच्या सर्व **वर्गाला** किंवा **जातीला** साधारणपणानें लागू पडणारीं असतात; म्हणून त्यांना आपण "**सामान्यनामें**" असें म्हणूं.

---

### प्रश्न व गृहपाठ

१. खालीलपैकीं कोणतीं **विशेषनामें** व कोणतीं **सामान्यनामें** आहेत, तें ओळखाः—

रामराव, चोरी, खेद, धोतर, तोंड, कुत्रा, झोके, धर्म, भिकंभट, गोपू, भाऊराव, पेढे, सुकेळीं, चित्र, पालखी, महिना, श्रावण, शेतकरी, देव, शक्ति, डोंगर, पर्वत, मनुष्यें, जनावरें, पक्षी, शामू, धोंडू, जगू, सोबत, मामा, बोरें, रखवालदार, बाबा, मेंढरूं, कोंकरूं, वामन, बकासुर, भीम, गाडा, पांडव, वाघ, कोल्हा, अहंमद, अरबस्तान, राक्षस, पुणें, सातारा, सोलापूर, हिंगणें, चोरी, पडछाया, विठू, सावित्री, यम, साखर.

२. वरील शब्दांतील **विशेषनामें** व **सामान्यनामें** वेगळीं काढून घरून लिहून आणा.

---

## २. नामांचे भेद–२

आतां आपल्याला माहीत असलेल्या खालील नांवांचा विचार करूं. तीं **एकट्याच वस्तूचीं** किंवा **एकट्याच प्राण्याचीं** नांवें आहेत, अथवा एकसारख्याच अशा **अनेक वस्तूंना** किंवा **अनेक प्राण्यांना** म्हणजे त्यांच्या सबंध **वर्गाला** किंवा **जातीला** लागू पडणारीं नांवें आहेत, पहा बरें ?

| | | | |
|---|---|---|---|
| सौंदर्य, | धैर्य | शौर्य, | हीं सर्व **गुणांचीं** नांवें आहेत, हें आपल्यास माहीतच आहे; पण मागील पाठांतल्याप्रमाणें हीं एकट्या वस्तूचीं, एकट्याच प्राण्याचीं |
| वक्तृत्व, | विद्वत्व, | मूर्खत्व, | |
| क्रूरता, | विद्वत्ता, | मधुरता, | |
| मनुष्यपणा, | देवपणा, | भलेपणा, | |
| भामटेगिरी | लुच्चेगिरी | गुलामगिरी | |

किंवा एकसारख्याच अशा अनेक वस्तु अथवा अनेक प्राणी यांना तरी लागू पडणारीं म्हणजे त्यांची सबंध जात किंवा वर्ग दाखविणारीं अशीं नांवें आहेत काय ?

आपणांस विचार केल्यास आढळून येईल कीं, वरचीं सर्व गुणांचीं नांवें हीं अगोदर **वस्तूंचीं** किंवा **प्राण्यांचीं** नांवेंच नाहींत; मग तीं त्यांच्यासारख्या अनेकांना म्हणजे त्यांच्या सबंध जातीला किंवा वर्गाला कशीं लागू पडणार ?

यावरून हीं नांवें कांहीं मागील पाठांतल्या नांवांसारखीं नाहींत असें झालें; हीं त्यांपेक्षां निराळींच आहेत. मागील पाठांतील नांवें एकाच ठराविक वस्तूला, प्राण्याला, किंवा एकसारख्याच अशा अनेक वस्तूंच्या **जातीला** अथवा **वर्गाला** लागू पडणारीं आहेत; पण हीं नांवें वस्तूंच्या किंवा प्राण्यांच्या अंगच्या **गुणांचीं** आहेत; **वस्तूंचीं** नांवें नाहींत. ( ३ ) त्यांना "**भाववाचकनामें**" असें शहाण्या लोकांनीं पूर्वींच म्हटलें आहे, तेंच नांव आपणही त्यांस देऊं.

   

एवढ्या विचारावरून आपल्यास कोणत्या गोष्टी आढळून आल्या ?

**१. आपल्या बोलण्यांत तीन प्रकारचीं नामें येतात; ( १ ) विशेषनामें, ( २ ) सामान्यनामें व ( ३ ) भाववाचकनामें.**

**२. एकाच ठराविक वस्तूला किंवा प्राण्याला लागू पडणारें नांव दाखविणारा शब्द, तें " विशेषनाम."**

**३. एकसारख्याच अशा अनेक वस्तु किंवा अनेक प्राणी यांच्या सबंध जातीला किंवा वर्गाला लागू पडणारें नांव दाखविणारा शब्द, तें " सामान्यनाम."**

**४. गुणांचें नांव दाखविणारा शब्द, तें " भाववाचकनाम."**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. आपणांस नामांचे किती भेद आढळले ? कोणते ?

२. **विशेषनाम** व **सामान्यनाम** कसें ओळखावें ?

३. **भाववाचक नामां**त कशा प्रकारचीं नांवें येतात ?

४. क्रूर यापासून क्रौर्य, क्रूरता, क्रूरत्व, क्रूरपणा, अशीं **भाववाचक नामें** होतात; त्यांप्रमाणेंच सुन्दर, शूर, चतुर, ह्या तीन विशेषणांचीं **भाववाचक नामें** तयार करून घरून लिहून आणा.

५. दोन **विशेषनामें** व दोन **सामान्यनामें** एकेका वाक्यांत येतील, अशीं पांच वाक्यें लिहून आणा.

६. एक **सामान्यनाम** व दोन **भाववाचकनामें** घालून पांच वाक्यें घरून लिहून आणा.

७. खालील वाक्यांतील नामें कोणत्या प्रकारचीं आहेत, तें ओळखून सांगाः—

(१) **दशरथ** सत्यवचनी **राजा** होता; त्याचें **शौर्य** अप्रतिम होतें.
(२) **कैकेयीनें** त्यापाशीं **वर** मागितले; त्यानें ते **अविचारीपणानें** दिले.
(३) **रामास** आजच **वनवासास** पाठवावें; त्यानें **दैन्य** भोगावें.
(४) **भरतास युवराजपद** द्यावें; त्यानें **ऐश्वर्य** उपभोगावें.
(५) **दशरथास** त्यामुळें **दुःख** झालें; त्याचें **धैर्य** गळलें.
(६) **रामाला** सर्व **हकीकत** कळली; त्यानें **वडीलपणा** सोडिला.
(७) **भरताला** खुशाल **राज्य** द्या; त्याचें **महत्त्व** मला नाहीं.

---

# ३. सर्वनामांचे भेद–१

आपणांस नामांच्याबद्दल येणारे शब्द म्हणजे **सर्वनामें** माहीत झालीं आहेत; नामांप्रमाणेंच त्यांच्यामध्येंही कांहीं निरनिराळे प्रकार आढळतात कीं काय, तें आतां आपण पाहूं.

[ १ ]

खालील सर्वनामें कोणत्या नामासाठीं आलीं आहेत व तीं काय काम करीत आहेत बरें ? आपण त्यांच्यासंबंधीं ज्यास्त विचार करूं.

**क**

| | |
|---|---|
| १. (अ) **मी** एकटा जाणार नाहीं<br>(आ) **आम्ही** अथवा **आपण** सगळे जाऊं | येथें **मी, आम्ही** व **आपण** हे शब्द बोलणारा 'आपल्या' बद्दल वापरीत आहे, हें उघड आहे. |

म्हणजे बोलणारा एकटा असला, तर तो आपल्याबद्दल नेहमीं '**मी** जातों,' '**मी** आलों,' असें म्हणतो; व बोलणारे अनेक असल्यास ते आपल्याबद्दल '**आम्ही** जातों,' '**आम्ही** आलों,' किंवा '**आपण** जाऊं,' '**आपण** खाऊं,' असे शब्द वापरतात; म्हणजे **मी आम्ही,** व **आपण** हीं सर्वनामें बोलणारा आपल्याबद्दलच वापरतो; असें झालें.

**ख**

| | |
|---|---|
| २. (अ) **तूं** पुस्तक फाडलेंस<br>(आ) **तुम्ही** किंवा **आपण** भोजनास याल का ? | येथें **तूं, तुम्ही** किंवा **आपण** हे शब्द बोलणारा ज्याच्याशीं बोलतो, त्याबद्दल आले आहेत. |

म्हणजे बोलणारा ज्याच्याशीं बोलतो, तो एकटा असल्यास त्याबद्दल '**तूं** जा,' '**तूं** ये,' '**तूं** बस,' असे शब्द वापरतो; व ज्याच्याशीं बोलावयाचें ते अनेक असल्यास, त्यांबद्दल '**तुम्ही** अथवा **आपण** या,' '**तुम्हीं** अथवा **आपण** बोलावें,' असे शब्द तो वापरतो; म्हणजे **तूं**, **तुम्ही** व **आपण** हे शब्द ज्याच्याशीं बोलावयाचें त्याच्याबद्दल तो योजितो, असें स्पष्ट कळतें.

[ २ ]

आतां खालील सर्वनामें बोलणारा कोणाबद्दल वापरीत आहे, पहा बरें ?

**ग**

| | |
|---|---|
| ३. (अ) **तो** (मनुष्य) लुच्चा आहे<br>(आ) **ती** (मुलगी) आईला बोलावते<br>(इ) **तें** (कुत्रें) रात्रीं रडतें | यांतील **तो, ती, तें,** हीं सर्वनामें बोलणारा आपल्याबद्दल वापरीत आहे काय ? ज्याच्याशीं बोलावयाचें त्याबद्दल तरी वापरीत आहे काय ? |

हीं सर्वनामें बोलणारा आपल्याबद्दल वापरीत नाहीं, हें उघड आहे. त्याचप्रमाणें ज्याच्याशीं बोलावयाचें, त्याच्याबद्दलही तो हीं सर्वनामें वापरीत नाहीं; कारण, '**तो**' असें म्हटलें म्हणजे बोलणारा किंवा ऐकणारा यांपैकीं कोणी नव्हेत; परंतु '**मी**' किंवा '**आम्ही**' असें म्हटलें, तर बोलणाराच्याबद्दल तीं सर्वनामें आहेत, असें कळतें; व '**तूं**' किंवा '**तुम्ही**' असें म्हटलें, तर ज्याच्याशीं बोलावयाचें त्याच्याबद्दलच तीं सर्वनामें आहेत, असें कळतें; यावरून **तो–ती–तें,** व पुष्कळ असल्यास **ते–त्या–तीं,** हीं सर्वनामें बोलणाराबद्दल किंवा ज्याच्याशीं

बोलावयाचें त्याबद्दलही येत नाहींत; असें दिसतें. तर तीं **तिसऱ्या** निराळ्याच गोष्टींबद्दल येतात.

ह्या सर्व विचारावरून आपल्याला असें आढळून आलें कीं, ( १ ) **मी** व **आम्ही** हीं सर्वनामें बोलणारा आपल्याबद्दल योजितो; ( २ ) **तूं** व **तुम्ही** हीं सर्वनामें बोलणारा ज्याच्याशीं बोलतो, त्याबद्दल योजितो; आणि ( ३ ) **तो–ती–तें** व **ते–त्या–तीं** हीं सर्वनामें ज्या निराळ्याच गोष्टींबद्दल बोलावयाचें असतें, त्या सर्वांबद्दल बोलणारा योजितो.

**पहिला** बोलणारा पुरुष म्हणजे बोलणारा मनुष्य; **दुसरा** ज्याच्याशीं बोलावयाचें तो पुरुष किंवा तो मनुष्य; आणि **तिसरें** ज्यांच्याबद्दल बोलणें चाललें असतें, ते सर्व; ह्या दृष्टीनें सर्वनामांचे हे तीन प्रकार दिसतात. बोलणारा हा नेहमीं **पहिला** मनुष्य किंवा **पहिला** पुरुष असतो, म्हणून त्याच्याबद्दल येणाऱ्या सर्वनामास **प्रथम-पुरुष-वाचक सर्वनाम**; ज्याच्याशीं बोलावयाचें तो **दुसरा** मनुष्य किंवा **दुसरा** पुरुष असतो, म्हणून त्याबद्दल येणाऱ्या सर्वनामास **द्वितीय-पुरुष-वाचक सर्वनाम** आणि ज्या **तिसऱ्या** गोष्टींबद्दल बोलावयाचें असतें त्यांचा **तिसरा** पुरुष समजून, त्यांबद्दल येणाऱ्या **तो, ती, तें** व **ते, त्या, तीं** ह्या सर्वनामांस **तृतीय-पुरुषवाचक सर्वनाम**; असें म्हणतात.

   

ह्यावरून आपल्यास सर्वनामांसंबंधानें कोणत्या गोष्टी आढळून आल्या ?

**१. सर्वनामांचे बोलणारा पुरुष, ऐकणारा पुरुष व ज्याविषयीं बोलावयाचें तो पुरुष, ह्या दृष्टीनें तीन भेद पडतात.**

**२. प्रथम-पुरुषवाचक सर्वनाम, द्वितीय-पुरुषवाचक सर्वनाम, व तृतीय-पुरुषवाचक सर्वनाम, अशीं त्यांचीं नांवें आहेत.**

**३. मी, आम्ही, ( व केव्हां केव्हां आपण ) हीं प्रथम पुरुषवाचक सर्वनामें; तूं, तुम्ही, ( व केव्हां केव्हां आपण ) हीं द्वितीय पुरुष-वाचक सर्वनामें; आणि तो, तीं, तें, हीं तृतीय पुरुषवाचक सर्वनामें.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. सर्वनामांचे कोणत्या दृष्टीनें भेद पडले? ते किती भेद आढळले?

२. **पुरुषवाचक** सर्वनाम म्हणजे काय? ह्या ठिकाणीं **पुरुष** म्हणजे काय?

३. **प्रथम-पुरुषवाचक** सर्वनामें व **द्वितीय-पुरुषवाचक** सर्वनामेंच वाक्यांत येतील, अशीं तीन--चार वाक्यें घरून लिहून आणा.

४. **तृतीय-पुरुषचवाक** सर्वनामें कोणतीं? तीं ज्यांत येतील अशीं तीन-चार वाक्यें लिहून आणा.

५. खालील वाक्यांतील सर्वनामें कोणत्या प्रकारचीं आहेत तें सांगा:—

(१) हे राजा, **तूं** गरीबांचा कैवारी आहेस असें ऐकलें म्हणून **मी** येथें खेळत राहिलों. (२) **तूं मला** सोड म्हणजे **आम्ही** सगळे **तुझी** सेवा करूं. (३) **तो** राजा कसला? (४) पांखरूं मारणें **हें तुला** योग्य नाहीं. (५) **ती मला** ओरबाडते. (६) **तें** किरकिरें आहे. (७) **त्या** निघून गेल्या. (८) आमच्या खेळांत **ते** नकोत. (९) **तूं** हवा तर ये.

---

# ४. सर्वनामांचे भेद – २

[ १ ]

मागील पाठांत आपण सर्वनामांचा **पुरुषाच्या** दृष्टीनें विचार केला; आतां आणखी निराळ्या दृष्टीनें विचार करूं.

खालील सर्वनामें पुरुषाशिवाय आणखी कांहीं निराळ्या अर्थांनीं उपयोगांत येत आहेत काय ? लक्षपूर्वक पहा.

१. (क) **हा** आखूड आहे
(ख) **ही** क़ोरी आहे
(ग) **हें** अरुंद आहे

येथें **हा, ही, हें,** म्हणजे कोण ? कोणाबद्दल हे शब्द आले आहेत ? आपल्याला "पूर्वीं माहीत असलेल्या" मनुष्याबद्दल किंवा वस्तूबद्दल हे शब्द आले आहेत, असेंच यावरून कळत नाहीं का ? त्यांवरून आपल्यास "पूर्वीं माहीत असलेलें" च दाखविलें जात नाहीं काय ? हीं सर्वनामें आणि पुष्कळ असल्यास **हे, ह्या, हीं,** हीं सर्वनामें "पूर्वीं माहीत असलेलें" च **दाखविण्याच्या** अर्थानें विशेषतः उपयोगांत येतात; असें दिसतें.

२. (अ) **जो** अभ्यास करितो, तो पास होतो.
(आ) **जी** पोळ्या करिते, ती कोणती बाई ?
(इ) **जें** तुला आवडतें, तें हेंच का पुस्तक ?

येथें **जो, जी, जें,** हीं सर्वनामें कोणत्या अर्थानें उपयोगांत आलीं आहेत बरें ? पुढील वाक्यांतून येणाऱ्या 'तो ती, तें,' ह्या सर्वनामांशीं आपला **संबंध** दाखविण्यासाठीं तीं विशेषतः उपयोगांत आलीं आहेत; नाहीं काय ?

"**जो** करील, तो भरील;" येथें **जो** याचा 'तो' ह्या शब्दाशीं **संबंध** आहे. "**ज्याला** विद्या आहे, त्याला पैसा मिळतोच असें नाहीं;" येथें **ज्याला** ह्याचा 'त्याला' ह्या शब्दाशीं **संबंध** आहे. म्हणजे **जो, ज्याला,** हीं सर्वनामें आणि पुष्कळ असल्यास **जे, ज्या, जीं,** ही सर्वनामें पुढल्या शब्दाशीं **संबंध** दाखविण्याच्या अर्थानें विशेषतः उपयोगांत येतात; असें दिसून येतें.

३. (अ) तेथें **कोण** आहे ?
तुला **कोण** रागावलें ?
(आ) येथें **काय** आहे ?
तूं **काय** पाहिलेंस ?

येथें **कोण** व **काय** हीं सर्वनामें **प्रश्न** विचारण्यासाठीं आलीं आहेत; हें उघडच आहे.

याचप्रमाणें त्या सभेंत **कोण** होते ? तुला **काय** हवें ? अजून **काय** आणायचें राहिलें ? ह्या ठिकाणींही **कोण** व **काय** हीं सर्वनामें **प्रश्न** करण्यासाठींच आलेलीं आहेत; त्यांपासून **प्रश्न** विचारण्याचा आणखी ज्यास्त अर्थ कळत आहे.

४. [अ] तो **कोण** आहे,
तें मला माहीत नाहीं.
[आ] मजजवळ **काय** आहे
तें सांग.
[इ] **कोणी** घ्या आंबा,
**कोणी** घ्या पेरू.

ह्या ठिकाणीं **कोण, काय** व **कोणी,** हींच सर्वनामें आहेत, पण तीं वरच्याप्रमाणें प्रश्न करण्यासाठीं उपयोगांत आलीं आहेत काय ? तीं कोणत्या निश्चित प्राण्याबद्दल किंवा वस्तूबद्दल आलीं आहेत बरें ? आपल्यास असें आढळून येईल कीं, ह्या ठिकाणीं **कोण, काय** व **कोणी,** हीं सर्वनामें प्रश्नही करण्यासाठीं आलीं नाहींत; किंवा निश्चित अशा एकाद्या प्राण्याबद्दल किंवा वस्तूबद्दलही आलीं नाहींत; तर तीं **सामान्यपणें कोणती तरी** वस्तु किंवा प्राणी यांच्याबद्दल, उपयोगांत आलीं आहेत; असें दिसतें.

[२]

याप्रमाणें सर्वनामांत कांहीं (१) पूर्वी माहीत असलेले प्राणी किंवा वस्तु यांचा बोध करणारीं, यांना **दाखविणारीं;**

(२) तसेंच कांहीं पुढल्या त्याच्या जोडीच्या सर्वनामाशीं **संबंध** असणारीं; कांहीं (३) **प्रश्न** करण्यासाठीं येणारीं; व कांहीं (४) **सामान्य**पणें किंवा अनिश्चित वस्तूबद्दल येणारीं आहेत; हें आपण वर पाहिलेंच. ह्या सगळ्या सर्वनामांची त्यांच्या अर्थाप्रमाणें त्यांना नांवें देऊन, खालीं नीट मांडणी करून घेऊं या.

| | [एक असल्यास] | [पुष्कळ असल्यास] |
|---|---|---|
| १. **पुरुषवाचक**– | मी | आम्ही, आपण |
| | तूं | तुम्ही, आपण |
| | तो, ती, तें | ते, त्या, तीं |
| २. **दर्शक**– | हा, ही, हें | हे, ह्या, हीं |
| ३. **संबंधी**– | जो, जी, जें | जे, ज्या, जीं |
| ४. **प्रश्नार्थक**– | कोण, काय | कोण, काय |
| ५. **सामान्य**– | कोण, काय, कोणी | कोण, काय, कोणी |

एवढ्या विचारावरून सर्वनामांसंबंधानें आज आणखी कोणत्या गोष्टी आपणांस आढळून आल्या ?

**१. सर्वनामांचे पांच भेद पडतात.**

**२. (१) पुरुषवाचक, (२) दर्शक, (३) संबंधी, (४) प्रश्नार्थक व (५) सामान्य; अशीं त्यांचीं नांवें आहेत.**

### प्रश्न व गृहपाठ

१. खालील वाक्यांतील सर्वनामांचे प्रकार सांगा—

(१) **जो** कष्ट करितो, **तो** सुख भोगतो. (२) तुला **कोण** भेटला ? (३) **त्यानें** तुला **काय** सांगितलें ? (४) तूं मंडईतून **काय** आणलेंस ? (५) **ही** फार नाचरी आहे. (६) **हिला** एके ठिकाणीं राहण्यास नको. (७) **जें** आवडेल **तें** खा. (८) **हा** अगदीं लहान आहे. (९) **हा** रांगत नाहीं. (१०) **ही** याची आई. (११) **हें** याचें अंगडें. (१२) **तो** घट्ट मुठी धरितो. (१३) **तो** सर्वांना आवडतो. (१४) **ते** त्याचे झूल. (१५) **त्या** त्याच्या बाळ्या. (१६) **हे** वाळे, (१७) **हे** त्याला शोभतात. (१८) **जी** याला खेळविते, (१९) **ती** भाग्यवान् नाहीं का ? (२०) याला **कोणी** रागावत नाहीं.

---

# ५. विकारी व अविकारी शब्द

[ १ ]

(१) **कावळा** उडाला, **कावळे** काळे असतात, **कावळ्यानें** वाटी नेली, **कावळ्यांनीं** काव काव केलें, **कावळ्याला** दोन पंख असतात, **कावळ्याहून** कोकिळा लहान असते, **कावळ्याची** चोंच बळकट असते.

ह्या प्रत्येक वाक्यांत ‘ **कावळा** ’ हा एकच शब्द किती तरी निरनिराळ्या रूपांत दिसत आहे, आणि हा शब्द **नाम** आहे.

(२) **हा** कावळा, **हे** कावळे, **ह्यांनीं** वाटी नेली, **ह्यानें** काव काव केलें, **ह्याला** हाकलायला पाहिजे, **ह्याहून** ज्यास्त काळा कोण आहे ? **ह्याची** दृष्टि तीव्र असते.

ह्या प्रत्येक वाक्यांतील '**ह्या**' हा शब्द वरच्या कावळा ह्या शब्दाप्रमाणेंच किती तरी निरनिराळ्या रूपांत दिसत आहे; आणि तो 'सर्व नांवांच्या बद्दल येणारा' शब्द म्हणजे **सर्वनाम** आहे.

( ३ ) **काळा** घोडा, **काळी** घोडी, **काळें** घोडें, **काळ्या** घोड्या, **काळे** घोडे.

ह्यांतील प्रत्येक ठिकाणीं '**काळा**' ह्या शब्दाच्या रूपांत फरक दिसत आहे; आणि हा शब्द 'नामांचा गुण दाखविणारा' म्हणजे **विशेषण** आहे.

( ४ ) गंगू **बसते,** गंगू **बसली,** गंगू **बसेल,** गंगाबाई **बसतील,** गंगू **बस,** गंगूनें **बसावें.**

ह्या प्रत्येक वाक्यांत '**बस**' हा शब्द आपल्याला किती तरी प्रकारांत आढळून येत आहे; आणि हे सर्व शब्द **क्रियापदें** आहेत.

ह्यावरून असें दिसतें कीं, **नामें, सर्वनामें, विशेषणें** व **क्रियापदें,** ह्या शब्दांचें एकच एक रूप नेहमीं असत नाहीं; म्हणजे हे शब्द **बदलतात;** त्यांच्या रूपांत फरक होतो.

[ २ ]

आतां खालील जाड अक्षरांतील शब्द असेच बदलतात काय?

( १ ) **हळू** चला, **लौकर** उठा, **आज** व **उद्यां** शाळेचें संमेलन आहे, तुला **जेथें** जागा सांपडेल **तेथें** बस, मला **जेव्हां** फुरसत होईल **तेव्हां** मी येईन.

( २ ) गोविंदा **आणि** मी शाळेंत गेलों, **पण** पाटी **व** पुस्तक नेण्यास विसरलों, **म्हणून** शिक्षक रागावले.

( ३ ) तुझ्या अशा कृत्यांमुळें माझ्याकडून यापेक्षां ज्यास्त कांहीं मदत तुला मिळणार नाहीं; तुझ्यासाठीं मीं फार झीज सोसली.

( ४ ) अहाहा ! दिवे ओवाळा त्याला. शाबास ! पहिला नंबर आला ना ? छट् ! मला हें पसंत नाहीं.

ह्यांतील कोणताही शब्द ' हळूस, हळूनें '; ' आणीस, आणीचा '; अशा रीतीनें बदललेला दिसत नाहीं. वरच्या शब्दांत ज्याप्रमाणें फरक झाला आहे, तसा या शब्दांत केव्हांच झालेला आढळून येत नाहीं; म्हणजे हे शब्द **मुळींच बदलत नाहींत,** अशा प्रकारचे आहेत.

ह्यावरून आपल्या बोलण्यांत कांहीं शब्द बदलणारे आहेत व कांहीं न बदलणारे आहेत, असें झालें. **बदल** म्हणजे **विकार;** म्हणून बदलणाऱ्या शब्दांना **विकारी** व न बदलणाऱ्या शब्दांना **अविकारी** शब्द, अशीं नांवें आहेत. **अविकारी** ह्यालाच **' अव्यय '** असें दुसरें नांव आहे. म्हणूनच वरच्यांतल्या न बदलणाऱ्या शब्दांना नुसतें क्रियाविशेषण, उभयान्वयी, शब्दयोगी, व उद्गारवाचक किंवा केवलप्रयोगी असें न म्हणतां, क्रियाविशेषण **अव्यय,** उभयान्वयी **अव्यय,** शब्दयोगी **अव्यय,** व उद्गारवाचक किंवा केवलप्रयोगी **अव्यय,** असें अनुक्रमें म्हणतात.

   

आज आपण काय शोधिलें ?

**१. शब्दांत कांहीं बदलणारे म्हणजे विकारी व कांहीं न बदलणारे म्हणजे अविकारी असे शब्द आहेत.**

**२. नामें, सर्वनामें, विशेषणें व क्रियापदें, हे बदलणारे म्हणजे " विकारी " शब्द.**

**३. क्रियाविशेषण, उभयान्वयी, शब्दयोगी व उद्गारवाचक हे न बदलणारे म्हणजे "अविकारी" शब्द किंवा "अव्ययें."**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. **विकारी** व **अविकारी** शब्द म्हणजे काय?

२. कोणत्या दृष्टीनें **विकारी** व **अविकारी** असे शब्दांचे भेद पडतात?

३. **अव्यय** म्हणजे काय? **अव्यय**-शब्द कोणते?

४. शब्दांचे आठ प्रकार कोणत्या दृष्टीनें आपण केले?

५. **विकारी** शब्द कोणते?

६. **अव्ययें** कधींच बदलत नाहींत काय? कशावरून?

७. पुढील शब्दांपैकीं कोणते शब्द **विकारी** व कोणते **अविकारी**? कां? राम, चांगला, हळू, एव्हां, तेथें, तो, दगड, काठी, निशाण, जर, जवळ, अबब, देव, पण, किंवा, राजा, विद्वान्, पेक्षां, छे, इ०.

---

# ६. लिंग

[ १ ]

आपल्या बोलण्यांत कांहीं शब्द बदलणारे व कांहीं न बदलणारे आहेत, हें आपल्यास कळलें; आतां यांपैकीं बदलणारे शब्द किती प्रकारांनीं बदलतात, त्याचा विचार करूं.

वाघ — वाघीण ही — हिनें

भला — भल्यांचा कर — करतो

ह्या जोड्यांतील पहिल्या प्रकारचे व दुसऱ्या प्रकारचे शब्द ह्यांत काय बरें फरक आहे? दोन्ही शब्दच आहेत कीं नाहींत?

असें सहज कळतें कीं, दोन्ही शब्दच आहेत; पण पहिला **मूळ शब्द** आहे व दुसरा त्यांत भर घालून झालेला—पहिल्याला **बदल करून झालेला**—शब्द आहे. मूळ शब्द आणि मूळ शब्दाचा बदल-लेला शब्द हीं कळण्यास आपल्यास कांहींच अडचण पडत नाहीं.

आपण खालील शब्द कसे बदलले आहेत, तें पाहूं या:—

| नामें | | | विशेषणें | | |
|---|---|---|---|---|---|
| मुलगा | मुलगी | मुलगें | चांगला | चांगली | चांगलें |
| कुत्रा | कुत्री | कुत्रें | खोटा | खोटी | खोटें |
| बकरा | बकरी | बकरें | पहिला | पहिली | पहिलें |

| सर्वनामें | | | क्रियापदें | | |
|---|---|---|---|---|---|
| हा | ही | हें | जातो | जाते | जातें |
| तो | ती | तें | आला | आली | आलें |
| जो | जी | जें | करावा | करावी | करावें |

ह्या शब्दांवरून कोणती गोष्ट एकदम मनांत येते बरें ?

ह्यांपैकीं पहिले शब्द **पुरुष-जातीचे** वाटतात; दुसरे **स्त्री-जातीचे** वाटतात, आणि तिसरे **पुरुष** व **स्त्री** ह्यांशिवाय **निराळ्या जातीचे** वाटतात, नाहीं का ?

[ २ ]

आतां खालील शब्दांची जात काय बरें असावी ? सर्व शब्दांना जात असतेच काय ? असल्यास ती कशी कळावी बरें ?

**घोडा**

**'घोडा'** हा पुरुष-जातीचा प्राणी आहे. म्हणून—

**'घोडा'** हा शब्दही पुरुष-जात दाखविणारा आहे.

याचप्रमाणें वाघ, सिंह, लांडगा, बैल, हत्ती, मोर, कुत्रा, बोकड, वानर, असे पुष्कळ शब्द पुरुष-जात दाखविणारे आहेत.

**गाय**

**'गाय'** हा स्त्री-जातीचा प्राणी आहे. म्हणून—

**'गाय'** हा शब्दही स्त्रीजात दाखविणारा आहे.

याचप्रमाणें वाघीण, सिंहीण, लांडगी, हत्तीण, लांडोर, कुत्री, शेळी, वानरी, असे पुष्कळ शब्द स्त्री-जात दाखविणारे आहेत.

परंतु **'सूर्य'** हा कोणत्या जातीचा प्राणी आहे किंवा कोणत्या जातीचा शब्द आहे ? तो पुरुष किंवा स्त्री ह्यांपैकीं कोणत्या वर्गांतला आहे ? तसेंच—

| | | | |
|---|---|---|---|
| **दरवाजा** | **आंबा** | **हिमालय** | हे कोणत्या जातीचे किंवा कोणत्या वर्गांतले शब्द आहेत ? |
| **भिंत** | **चिंच** | **गंगा** | |
| **फूल** | **देऊळ** | **नागांव** | |

हे काय प्राणी आहेत, तर आपल्याला त्यांची पुरुष-जात किंवा स्त्री-जात अथवा ते पुरुष-वर्गांतील किंवा स्त्री-वर्गांतील आहेत असें कळेल ? ह्यांना पुरुष, स्त्री, असें कसें बरें म्हणावें ?

[ ३ ]

पण आपल्याला नेहमींच्या बोलण्याच्या रीतीवरून तें सहज कळतें. **'तो दरवाजा'** असें आपण म्हणतों, म्हणून दरवाजा हा **पुरुष-वर्गांतला** शब्द; **'ती भिंत'** असें आपण म्हणतों म्हणून भिंत हा **स्त्री-वर्गांतला**

शब्द; तसेंच, '**तें** फूल' असें आपण म्हणतों म्हणून फूल हा **पुरुष नाहीं व स्त्री नाहीं** अशा प्रकारचा शब्द. ह्याचप्रमाणें:—

| | |
|---|---|
| (१) **सूर्य**, चन्द्र, शुक्र, बुध, शनि, आंबा, नारळ, पेरू, अननस, रस्ता, दिवा, घोंडा, दगड, खांब, हिमालय, सह्याद्रि, सातपुडा, विंध्य. | हे **पुरुष–वर्गांतले** शब्द. (कारण **तो** सूर्य, **तो** चन्द्र, **तो** आंबा, **तो** नारळ, **तो** रस्ता, **तो** दिवा, **तो** हिमालय, **तो** सह्याद्रि, असें आपण म्हणतों.) |
| (२) गंगा, यमुना, अयोध्या, नदी, पुरी, चिंच, केळ, सिताफळ, कोबी, दौत, लेखणी, विळी, सुरी, पाटी, पागा, वेळ, रीत, चूक. | हे **स्त्री–वर्गांतले** शब्द. (कारण, **ती** गंगा, **ती** यमुना, **ती** चिंच, **ती** केळ, **ती** दौत, **ती** पोथी, **ती** पाटी, **ती** रीत, **ती** चूक, असें आपण म्हणतों.) |
| (३) पुणें, नागपूर, नगर, शहर, केळें, रताळें, कलिंगड, संत्रें, पुस्तक, कपाट, टेबल, मेज, पान, फूल, देऊळ, भूत, सूत, ऊन, ऋण, लोखंड, सोनें, रुपें. | हे **पुरुष नाहींत व स्त्री नाहींत** अशा वर्गांतले शब्द. (कारण, **तें** पुणें, **तें** नागपूर, **तें** केळें, **तें** पुस्तक, **तें** फूल, **तें** देऊळ, **तें** सोनें, **तें** भूत, असें आपण म्हणतों.) |

ह्याप्रमाणें मागें **तो, ती, तें,** हे खुणेचे शब्द लावून आपल्यास तो शब्द कोणत्या खुणेचा—कोणत्या वर्गांतला—आहे, हें ओळखतां येतें.

कोणत्या वर्गांतला किंवा कोणत्या खुणेचा शब्द आहे, हें कळणें याला '**लिंग**' असें दुसरें नांव आहे. पुरुष-वर्गांतला शब्द म्हणजे

**पुल्लिंगी,** स्त्री–वर्गांतला शब्द म्हणजे **स्त्रीलिंगी** आणि **पुरुष** व **स्त्री** नाहीं, अशा वर्गांतला शब्द म्हणजे **नपुंसकलिंगी.**

   

आज आपल्यास काय कळलें ?

**१. नाम, सर्वनाम, विशेषण व क्रियापद यांना "लिंग" असतें; हें कळलें.**

**२. पुल्लिंगी, स्त्रीलिंगी व नपुंसकलिंगी, असे तीन प्रकारचे शब्द आहेत; हें ध्यानांत आलें.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. **लिंगें** किती आहेत ? त्यांचीं नांवें कोणतीं ?

२. पुढील शब्द कोणत्या **लिंगी** आहेत, तें ओळखा—**सूर्य,** नदी, कोनाडा, कोंकण, मंबाजी, बकरें, मोठी, भाऊ, वहिनी, लांडोर, सज्जनपणा, रमा, राम, मदन, वदन, युक्ति, बुद्धि, मनन, अर्पण, आकाश, ढग, वृक्ष, झाड, वेल, विटीदांडू, साखरभात, पुरणपोळी, डाळवांगें, पुष्पमाला, लक्ष्मीकांत, घरदार, इ०.

३. **पुल्लिंगी, स्त्रीलिंगी** व **नपुंसकलिंगी** पांच पांच शब्द धरून लिहून आणा.

४. खालील वाक्यांतील ठळक अक्षरांच्या शब्दांचीं **लिंगें** ओळखा—

"**शेजाऱ्यानें** म्हटलें, **बया तूं** म्हणतेस **तें खरें** नव्हे. **थोडा विचार** कर. **तूं** रोज **जोंधळ्यांची भाकर भाजतेस, शेतांत तें** पेरून **त्यांचें पीक** कोण तयार **करितो? मीठ, मिरची, डाळ, तेल, हिंग, जिरें,** हीं तुला कोण पुरवितो ? **ही भाजीची विळी,** तुझ्या **घरांतलीं भांडीं, तुझें लुगडें, हें** काय आपोआप तयार झालें ? **म्हातारीस तें** पटलें; मग ती शेजाऱ्यास म्हणाली, खरेंच, **मला कुरकुर** करण्यास मुळींच **जागा** नाहीं."

---

# ७. वचन

खालील शब्दांपैकीं कोणते शब्द "**एक**" वस्तु दाखवितात व कोणत्या शब्दांवरून "**एकापेक्षां अधिक**" वस्तु कळतात, पहा बरें?

| [एक] | [एकापेक्षां अधिक] | [एक] | [एकापेक्षां अधिक] |
|---|---|---|---|
| घोडा | घोडे | जो | जे |
| बकरा | बकरे | ही | ह्या |
| चिंच | चिंचा | चांगला | चांगले |
| शेळी | शेळ्या | लंगडा | लंगडे |
| मूल | मुलें | बसतो | बसतात |
| फूल | फुलें | गेली | गेल्या |

ह्यांतील पहिल्या शब्दांवरून **एका** वस्तूचा बोध होतो व दुसऱ्या शब्दांवरून **एकापेक्षां अधिक** वस्तूंचा बोध होत आहे, हें उघडच आहे. म्हणजे नामें, सर्वनामें, विशेषणें व क्रियापदें ह्यांवरून "**एक**" किंवा "**एकापेक्षां अधिक**" हेंही कळतें; असें झालें.

उदाहरणार्थ हीं खालील वाक्यें पहा—

(१) **मुलगा पोथी वाचतो.** (२) **मुलगे पोथ्या वाचितात.**

| | |
|---|---|
| **मुलगा** (एक कीं पुष्कळ?) **एक** | **मुलगे** (एक कीं पुष्कळ?) **पुष्कळ** |
| **पोथी** (एक कीं पुष्कळ?) **एक** | **पोथ्या** (एक कीं पुष्कळ?) **पुष्कळ** |
| **वाचितो** (एकटा कीं पुष्कळ?) **एक** | **वाचितात** (एक कीं पुष्कळ?) **पुष्कळ** |

ह्यांत पहिल्या वाक्यांतील प्रत्येक शब्दावरून **एका** वस्तूचा बोध

होतो; व दुसऱ्या वाक्यांतील प्रत्येक शब्दावरून **पुष्कळ** वस्तूंचा बोध होतो.

| (३) चोरांनीं दागिना नेला. | (४) चोरानें दागिने चोरिले. |
|---|---|
| **चोरांनीं** (एक कीं पुष्कळ?) **पुष्कळ** | **चोरानें** (एक कीं पुष्कळ?) **एक** |
| **दागिना** (एक कीं पुष्कळ?) **एक** | **दागिने** (एक कीं पुष्कळ?) **पुष्कळ** |
| **नेला** (एक कीं पुष्कळ?) **एक** | **चोरिले** (एक कीं पुष्कळ?) **पुष्कळ** |

ह्या तिसऱ्या वाक्यांतील कांहीं शब्दांवरून **एका** वस्तूचा व कांहीं शब्दांवरून **पुष्कळ** वस्तूंचा बोध होतो; त्याचप्रमाणें चौथ्याही वाक्यांतील कांहीं शब्दांवरून **एका** वस्तूचा व कांहीं शब्दांवरून **पुष्कळ** वस्तूंचा बोध होतो.

म्हणजे शब्दाच्या संबंधानें आणखी अशीही एक गोष्ट आढळून येते कीं, शब्दावरून **एक वस्तु** किंवा **पुष्कळ वस्तु** ह्या कळवावयाच्या असल्या, तरीही त्या शब्दांत बदल होतो.

वस्तु **एक** आहे किंवा **पुष्कळ** आहेत असें सांगणें किंवा बोलणें ह्याला "**वचन**" असें दुसरें नांव आहे. शब्दावरून **एक वस्तु** कळत असली, तर त्या शब्दाचें "**एकवचन;**" आणि त्यावरून **पुष्कळ वस्तु** कळत असल्या, तर त्याचें "**अनेकवचन;**" असें म्हणण्यास आपणास कांहींच हरकत नाहीं.

   

आज आपल्याला खालील गोष्टी समजल्या:—

**१. 'वचन' म्हणजे वस्तु "एक" कीं "पुष्कळ" तें सांगणें.**

**२. "एकवचन" व "अनेकवचन" अशीं दोन वचनें आहेत.**

**३. नाम, सर्वनाम, विशेषण व क्रियापद यांना वचन असतें.**

## प्रश्न व गृहपाठ

१. **नाम,** सर्वनाम व विशेषण ह्यांचे कोणते विकार तुम्हांस माहीत झाले ?

२. शब्दांच्या **वचनावरून** आपणांस काय कळतें ?

३. तिन्ही लिंगें व दोन्ही वचनें यांचीं नांवें शुद्ध लिहा.

४. खालील शब्दांपैकीं ठळक अक्षरांतील शब्दांचें **वचन** सांगाः—

(१) इतक्यांत **वॉशिंग्टन** तेथें **आला.** (२) **बापानें** त्यास विचारिलें. (३) **ह्या झाडाची साल** कोणीं तासली ? (४) माझ्या **बागेंत** पुष्कळ **झाडें** आहेत. (५) **तीं मला** फार **आवडतात.** (६) **तुम्ही** ह्या **झाडांना हात** लावूं नका. (७) **बैलानें** आपल्या **शिंगांनीं माती उडविली.** (८) आमचे **बैल** फार चपळ **आहेत.** (९) **त्यांना चाबूक** उगारलेलाही खपत नाहीं. (१०) **ते पुण्यास** अर्ध्या तासांत जातात. (११) **गाडींत गादी** घाल व दोन **तक्क्ये** ठेव. (१२) **देवाची स्तुति** करावी. (१३) **माणसांची** करूं नये. (१४) **ज्यांनीं अभ्यास** केला नाहीं, (१५) **त्यांना चतरशिंगीस** जाण्याची **परवानगी** नाहीं. (१६) **आकाशांत ढग आले.** (१७) पण **पाऊस** कोठें आहे ? (१८) **हे** पहा **पावसाचे थेंब** आले.

---

# ८. विभक्ति—१

## [ १ ]

**राम** दशरथाचा मुलगा होता. कैकेयीनें **रामाला** वनास पाठविलें. **रामानें** वनवास पत्करिला. **रामाला** तो पत्करावा लागला. पण **रामा-हून** भरताला अधिक प्रिय कोणीच नव्हतें. तो **रामाचा** भाऊच

होता. त्याचें मन **रामीं** रंगलें होतें. तो म्हणाला, **रामा,** मी तुला सोडून जाणार नाहीं.

ह्या प्रत्येक ठिकाणीं **राम** हा मूळ शब्द आहे, व त्याला निरनिराळीं अक्षरें लागलेलीं दिसत आहेत; त्यांचें काम काय असावें बरें ? आपण शोधून पाहूं.

"**राम** दशरथाचा मुलगा होता" ह्या वाक्यांत **राम** हा मूळ शब्द तसाच राहून वाक्याचा अर्थ नीट जमतो; परंतु "**रामास** कैकेयीनें वनास पाठविलें" या ऐवजीं '**राम** कैकेयीनें वनास पाठविलें' असें म्हणून चालत नाहीं; **राम** ह्या शब्दाला '**स**' हें अक्षर जोडावेंच लागतें; म्हणजेच त्याचा पुढल्या शब्दाशीं नीट संबंध जुळतो व योग्य तोच अर्थ उत्पन्न होतो. तसेंच "भरत **रामाचा** भाऊ होता" या ठिकाणीं 'भरत **राम** भाऊ होता' असें म्हटल्यास आपल्यास हवा तो अर्थ उत्पन्न होत नाहीं; योग्य अर्थ उत्पन्न होण्यास **राम** ह्या शब्दाला '**चा**' हें अक्षर जोडावेंच लागतें.

ह्यावरून नामाचा दुसऱ्या शब्दाशीं संबंध जोडण्यासाठीं हीं अक्षरें नामापुढें लागत असावीत, असें दिसतें.

त्यांतही पुनः "**रामाला** वनास पाठविलें" म्हटलें काय किंवा "**रामास** वनास पाठविलें" म्हटलें काय, एकच. त्याचप्रमाणें "**रामानें** वनवास पत्करिला" ह्या ऐवजीं "**रामें** वनवास पत्करिला" असें कवितेंत आलें, तरी दोहोंचा अर्थ एकच आहे. तेव्हां नामाचा दुसऱ्या शब्दांशीं संबंध दाखविण्यासाठीं अशीं एकेकाच अर्थाचीं अक्षरें नामाला लागून, नामाचे कांहीं 'गट' पडत असावे असें दिसतें.

[ २ ]

' **घर** ' ह्या शब्दाचे असे किती गट किंवा प्रकार पडतात, ते पहा बरें ?

**नाम**

| | [ ए० व० ] | [ अने० व० ] |
|---|---|---|
| ( १ ) | घर | घरें, |
| ( २ ) | घर, घरास, घराला, घरातें | घरें, घरांस, घरांला, घरांतें |
| ( ३ ) | घरानें, घराशीं | घरांनीं, घरांशीं |
| ( ४ ) | घरास, घराला, घरातें | घरांस, घरांला, घरांना, घरांतें |
| ( ५ ) | घरून, घराहून | घरांहून |
| ( ६ ) | घराचा-चे, घराची-च्या, घराचें-चीं | घरांचा-चे, घरांची-च्या, घरांचें-चीं |
| ( ७ ) | घरीं, घरांत | घरीं, घरांत |
| ( ८ ) | घरा, | घरांनो, |

त्याचप्रमाणें—

**सर्वनाम**

| | | |
|---|---|---|
| (१) | हा | हे |
| (२) | ह्यास, ह्याला | ह्यांस, ह्यांना |
| (३) | ह्यानें, ह्याशीं | ह्यांनीं, ह्यांशीं |
| (४) | ह्यास, ह्याला | ह्यांस, ह्यांना |
| (५) | ह्याहून | ह्यांहून |
| (६) | ह्याचा-ची-चें ह्याचे-च्या-चीं | ह्यांचा-ची-चें ह्यांचे-च्या-चीं |
| (७) | ह्यांत | ह्यांत |
| (८) | — | — |

**विशेषण**

| | | |
|---|---|---|
| (१) | वेडा | वेडे |
| (२) | वेड्यास-ला | वेड्यांस-ना |
| (३) | वेड्यानें-शीं | वेड्यांनीं-शीं |
| (४) | वेड्यास-ला | वेड्यांस-ना |
| (५) | वेड्याहून | वेड्यांहून |
| (६) | वेड्याचा-ची-चें वेड्याचे-च्या-चीं | वेड्यांचा-ची-चें वेड्यांचे-च्या-चीं |
| (७) | वेड्यांत | वेड्यांत |
| (८) | वेड्या, | वेड्यांनो, |

ह्या ठिकाणीं **‘घर’** हें नाम, **‘हा’** हें सर्वनाम व **‘वेडा’** हें विशेषण, हीं सर्व बहुश: एकाच तऱ्हेनें बदललेलीं आपल्याला दिसत आहेत; व हे हाक मारण्यासुद्धां एकंदर **आठ प्रकार** आढळून येत आहेत. ह्या एकेका प्रकारांत मूळ शब्दाला जीं दुसरीं अक्षरें जोडिलेलीं आहेत, तीं एकेकाच अर्थाचीं आहेत; त्यांपैकीं एकाबद्दल त्याच गटांतील दुसरें घातलें तरी चालतें, अशीं हीं एकंदर आठ रूपें आहेत.

ह्या रूपांना **“विभक्ति”** असें दुसरें नांव आहे. हे सर्व प्रकार ठराविक रीतीनेंच होतात; व ह्यांतील एकेका प्रकारांत शब्दाला लागणारीं अक्षरें ठराविकच आहेत; हेंही आपल्याला वर दिसून आलेंच आहे. ( फक्त **संबोधन–विभक्ती**चा मात्र वाक्यांतील इतर शब्दांशीं संबंध नसतो; बाकीच्यांचा असतो; हा तिचा विशेष आहे.)

---

# ९. विभक्ति–२

## [ १ ]

मागल्या पाठांतील प्रकारांना **पहिला प्रकार, दुसरा प्रकार,** इ० आपण म्हटलें तर काय बरें होईल? चालेल. ही कल्पना ठीक आहे. अशींच नांवें या विभक्तींस दिलेलीं आहेत; पण **पहिला, दुसरा,** असे शब्द न वापरतां, **पहिली** म्ह० **प्रथमा, दुसरी** म्ह० **द्वितीया,** असें विभक्तींना म्हटलें आहे; इतकेंच. तें आपण समजून घेऊं या.

| प्रकार | नांव | [ए०व० लाग० अक्षरें] | [अ०व० लाग० अक्षरें] |
|---|---|---|---|
| पहिला | **प्रथमा** | (मूळ शब्द, ठराविक अक्षरें नाहींत) | |
| दुसरा | **द्वितीया** | मूळ शब्द व स-ला-तें | स-ला-ना-तें |
| तिसरा | **तृतीया** | नें-एं-शीं | नीं-हीं-ईं-शीं |
| चौथा | **चतुर्थी** | स-ला-तें | स-ला-ना-तें |
| पांचवा | **पंचमी** | ऊन-हून | ऊन-हून |
| सहावा | **षष्ठी** | चा-ची-चें, चे-च्या-चीं | चा-ची-चें, चे-च्या-चीं |
| सातवा | **सप्तमी** | त-ईं-आं | त-ईं-आं |
| आठवा | **संबोधन** | — | नो |

याप्रमाणें पुढें लागणाऱ्या ठराविक अक्षरांवरून आपल्यास "**विभक्ति**" सहज ओळखतां येतील.

[ २ ]

वर दुसऱ्या व चौथ्या ह्या दोन्ही ठिकाणीं स-ला-तें हीं अक्षरें आहेत, हीं दोनदां निराळीं निराळीं कां लिहिलीं असावींत बरें ?

१. आई **मुलीस** निजविते
२. मृगजल **हरिणांना** फसवितें
३. कृष्णानें **कंसाला** चकविलें
४. सुज्ञें **सत्यातें** जोडावें

१. **आईला** आज बरें वाटतें
२. मुरांबा **शिंक्याला** टांग
३. **घरांना** कुलुपें आहेत
४. **दिवसास** निजूं नये

ह्यांतील पहिल्या व दुसऱ्या वाक्यांचें निरीक्षण करूं. काय बरें यांत फरक असावा ? असें दिसतें कीं, कोणाला निजविते ? **मुलीस;** कोणाला फसवितें ? **हरिणांना;** कोणाला चकविलें ? **कंसाला;**

कोणाला जोडावें ? **सत्यातें;** म्हणजे पहिल्या प्रत्येक ठिकाणीं क्रिया ‘ कशावर घडते ’ तें कळत आहे.

दुसऱ्या ठिकाणीं **आईला, शिंक्याला, घरांना, दिवसास,** ह्या शब्दांवरून क्रिया त्यांच्यावर घडत आहे, असें दिसत नाहीं. पहिल्या व दुसऱ्या वाक्यांत हा फरक आढळतो. तथापि, दोन्ही ठिकाणीं **स—ला—ना—तें** हींच अक्षरें मूळ शब्दाला लागलेलीं आहेत.

ह्यांपैकीं ‘ ज्यांवर क्रिया घडते, ’ अशा **स—ला—ना—तें** हीं अक्षरें लागलेल्या शब्दांची “ **द्वितीया** ” विभक्ति व इतर ठिकाणीं **स—ला—ना—तें** हीं अक्षरें लागलेल्या शब्दांची “ **चतुर्थी** ” विभक्ति मानितात; हें आपण ध्यानांत ठेवावयास पाहिजे.

   

कोणत्या गोष्टी आज आपण हुडकिल्या ?

**१. नामाचा दुसऱ्या शब्दाशीं संबंध दाखविण्यासाठीं तें नाम दाखविणारा मूळ शब्द व त्याला एकाच अर्थाचीं अक्षरें लागून मूळ शब्दाचीं एकंदर आठ रूपें किंवा आठ प्रकार होतात; त्यांना “ विभक्ति ” असें म्हणतात.**

**२. प्रथमा, द्वितीया, तृतीया, चतुर्थी, पंचमी, षष्ठी, सप्तमी व संबोधन, अशीं विभक्तींचीं नांवें आहेत.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. खालील वाक्यांतील ठळक शब्दांच्या विभक्ति ओळखा:—

(१) **गणपतराव रात्रीं नाटकास** गेले होते. (२) **ते नाटकाला** चांगला **रंग** येईना म्हणून **घरीं** येण्यास निघाले. (३) घराजवळ येतांच

**त्यांस** घरांतून **धूर** येतांना दिसला. (४) लगेच **ज्वालांचा लोट**ही बाहेर आला. (५) **त्यानें** घाबऱ्या घाबऱ्या **दाराशीं** जाऊन आपल्या **मुलांस कडी** काढण्यास ओरडून सांगितलें; (६) पण कोणी **ओ** देईना. (७) **त्याचा शेजारी कृष्णराव ह्यानें** मागल्या **बाजूस** जाऊन **मुलांना** ओरडून **हांका** मारिल्या. (८) तेव्हां **माडीची खिडकी** उघडली व **मुलांचा गोंगाट त्यांस** ऐकूं आला. (९) मग न घाबरतां **त्यानें** आपल्या **घरून** एक **जाजम** आणविलें; (१०) व **तें** पसरून धरून, त्यावर **उड्या** टाकण्यास **त्यानें मुलांस** सांगितलें. (११) याप्रमाणें **युक्तीनें त्यानें सर्वांचा बचाव** केला.

---

# १०. कर्ता व कर्म

## [ १ ]

| वाक्यें | | [ क्रिया करणारे ] |
|---|---|---|
| (१) **गोविंदा** गेला | (यांत जाणारा कोण?) | **गोविंदा** |
| (२) **मनी** बसली | (यांत बसणारी कोण?) | **मनी** |
| (३) **पक्षी** उडतो | (यांत उडणारा कोण?) | **पक्षी** |
| (४) **द्राक्षें** आहेत | (यांत असणारीं कोण?) | **द्राक्षें** |
| (५) **रुपये** नाहींत | (यांत नसणारे कोण?) | **रुपये** |

यावरून आपल्यास असें कळतें कीं, प्रत्येक वाक्यांत क्रिया '**करणारा**' कोण तो शब्द असतोच. वरील वाक्यांत, गेला, बसली, उडतो, आहेत, नाहींत, हीं क्रियापदें आहेत; व त्या वाक्यांतील गोविंदा, मनी, पक्षी, द्राक्षें, रुपये, हे क्रिया **करणारे** आहेत. क्रिया **करणारा** कोण हें दाखविणाऱ्या या शब्दांना "**कर्ता**" असें दुसरें

नांव आहे. **कर्ता** म्हणजे **करणारा;** जायचें असलें तर **जाणारा;** बसायचें असलें तर **बसणारा;** नसेल तर **नसणारा** किंवा कांहीं असेल तर **असणारा;** हे दाखविणारे शब्द '**कर्ते**' च होत.

[ २ ]

आतां खालील वाक्यें पाहूं:—

| | | |
|---|---|---|
| (१) रामा **आंबे** खातो | (यांत क्रिया व्हायला दुसऱ्या कोणत्या शब्दाची जरूरी आहे?) | **आंबा** या शब्दाची. |
| (२) शिक्षक **पद्य** शिकवितो | ( ,, ) | **पद्य** ह्या शब्दाची. |
| (३) हरीनें **गाईस** मारिलें | ( ,, ) | **गाईस** या शब्दाची. |
| (४) आई **मुलीला** निजविते | ( ,, ) | **मुलीला** ह्या शब्दाची. |

म्हणजे पहिल्या ठिकाणीं खायचें **काय** ती वस्तु दाखविणारा शब्द सांगितल्यावांचून भागतच नाहीं; दुसऱ्या ठिकाणीं शिकवावयाचें **काय** तो शब्द सांगणें अवश्यच आहे; तिसऱ्या ठिकाणीं मारण्याची क्रिया **कोणावर** घडते तो शब्द हवाच; व चवथ्या वाक्यांत निजविण्याची क्रिया **कोणावर** घडते तो शब्दही कळावयास हवाच; त्यावांचून बोलणें पुरें होणार नाहीं, असें आपल्यास आढळून येतें.

गोविंदा गेला, मनी बसली, पक्षी उडतो, द्राक्षें आहेत, रुपये नाहींत, झाड पडलें, वारा वाहतो, अशा वरच्यासारख्या वाक्यांत जायला, बसायला, उडायला, असायला, नसायला, पडायला, वहायला, दुसऱ्या कोणत्याही शब्दाची जरूर दिसत नाहीं;

जाणारा, बसणारा इ० म्हणजे "**कर्ता**" वाक्यांत असला कीं झालें.

परन्तु—

| | |
|---|---|
| **खाणें**<br>**शिकविणें**<br>**मारणें**<br>**निजविणें** | ह्या गोष्टी प्रत्यक्ष कराव्या लागतात; म्हणून ज्याप्रमाणें त्या क्रियांचा **कर्ता** अवश्य पाहिजेच; त्याप्रमाणें काय खायचें, काय शिकवायचें किंवा क्रिया कोणावर घडते, ते शब्द—**आंबे, पद्य, गाईस, मुलीला**—असे कांहीं तरी पाहिजेतच. ते शब्द नसतील, तर हीं वाक्यें पूर्ण कळणार नाहींत. |

**काय** खायचें, **काय** शिकवायचें, **काय** द्यायचें, हें दाखविणाऱ्या शब्दांना किंवा क्रिया **कोणावर** घडते, तें दाखविणाऱ्या शब्दांना "**कर्म**" असें दुसरें नांव आहे.

---

## ११. क्रियापदें

मागील पाठावरून असें कळून आलें कीं, प्रत्यक्ष **कृति** दाखविणारीं जीं क्रियापदें असतात, त्यांना हें "**कर्म**" असतें; आणि क्रिया व्हायला आणखी एकाद्या शब्दाची अवश्य जरूरी लागत नाहीं अशीं व नुसतीं **आहे, नाहीं, बसतो, जातो, येतो,** अशा प्रकारचीं स्वाभाविकपणें गोष्टी घडण्यासंबंधाचीं जीं क्रियापदें असतात, त्या क्रियापदांना "**कर्म**" नसतें; **कर्ता** मात्र दोहोंनाही असतोच.

"**कर्ता**" ओळखण्यासाठीं **करणारा** कोण, **जाणारा** कोण, **येणारा** कोण, **असणारा** कोण, **नसणारा** कोण, तें पहावें; म्हणजे झालें.

"**कर्म**" ओळखतेवेळीं **काय** करायचें, **काय** द्यायचें, **काय** खायचें, किंवा क्रिया **कोणावर** घडत आहे, तें पहावें; म्हणजे झालें.

कोणतेंही क्रियापद घेतलें, तरी तें ह्या दोहोंपैकीं एका प्रकारचें असणारच; म्हणजे 'कर्म असणारें' व 'कर्म नसणारें'. यांनाच (१) "**सकर्मक क्रियापद**" व (२) "**अकर्मक क्रियापद**" असें सुटसुटीत रीतीनें म्हणण्यास काय चिंता आहे? आपण यापुढें हींच नांवें वापरूं.

   

यावरून आपणांस कोणत्या गोष्टी कळून आल्या?

**१. कोणत्याही वाक्यांत क्रिया 'करणारा' कोण तें दाखविणारा शब्द म्हणजे "कर्ता" असतोच.**

**२. कांहीं वाक्यांत 'काय करायचें' किंवा 'क्रिया कोणावर घडते' तो शब्द म्हणजे "कर्म" असतें; व कांहींत तें नसतें.**

**३. क्रियापदाचे भेद दोन; "सकर्मक" व "अकर्मक."**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. क्रियापदाचे मुख्य भेद कोणते? ते कोणत्या दृष्टीनें पडतात?

२. "**कर्ता**" व "**कर्म**" हीं कशीं ओळखाल? कोणत्या क्रियापदांना "**कर्म**" असतें, व कोणत्या क्रियापदांना नसतें?

३. पुढील क्रियापदें "**सकर्मक**" कीं "**अकर्मक**"?—आहे, दिलें, मारतील, बसतों, पाहिजे, नको, पडलें, पाडलें, देववीन, जाववतें, खाववत नाहीं, येतो, आणलें, प्यावें, हंसावें, घ्या, आला, गेला, लिहीन, वाचणार नाहीं.

४. पुढील वाक्यांतील "**कर्ता**" व "**कर्म**" ओळखून सांगाः—(१) रामरावांचा एक आवडता कुत्रा होता. (२) तो घराची राखण उत्तम करी. (३) एकदां चोर आले. (४) त्यांनीं कुत्र्यापुढें एक भाकरीचा तुकडा टाकिला. (५) पण कुत्रा त्याला शिवला नाहीं. (६) उलट तो भुंकूं लागला. (७) मग

चोरांनीं त्यावर पिस्तुलाचा नेम धरिला. ( ८ ) तेव्हां कुत्रा थोडासा दूर गेला. ( ९ ) चोरांनीं जें द्रव्य नेलें, ( १० ) तें त्यांनीं एका शेतांत पुरून ठेविलें. ( ११ ) कुत्र्यानें ती जागा पाहिली. ( १२ ) सकाळीं तो आपल्या धन्याचें धोतर ओढूं लागला. ( १३ ) त्यानें धन्यास द्रव्य पुरलेल्या जागीं नेलें. ( १४ ) कुत्र्याच्या शहाणपणामुळें मालकास त्याचें द्रव्य मिळालें.

---

## १२. काळ

[ १ ]

| | |
|---|---|
| १. पृथ्वी सूर्याभोवतीं **फिरते** | ७. चंद्रावर डाग **आहेत** |
| २. पृथ्वी सूर्याभोवतीं **फिरत आहे** | ८. मजजवळ पैसे **नाहींत** |
| ३. गंगा पूर्वेकडे **वाहते** | ९. देवाला सर्व **दिसतें** |
| ४. गंगा पूर्वेकडे **वाहत आहे** | १०. शिक्षक **शिकवीत आहेत** |
| ५. देव आपणांस **रक्षितो** | ११. मुलें खोड्या **करीत आहेत** |
| ६. देव आपणांस **रक्षीत आहे** | १२. आतां ऊन **आहे** |

त्याचप्रमाणें—

| | |
|---|---|
| १. हा चिमुकला बालक **आहे** | ६. हा मला फार **आवडतो** |
| २. याचें मुख सुंदर **आहे** | ७. याला पाहून मला सुख **होतें** |
| ३. याचे चरण कोमल **आहेत** | ८. हा मजकडे पाहून **हसत आहे** |
| ४. हा घट्ट मुठी **धरीत आहे** | ९. त्याच्या मनांत काय **आहे बरें !** |
| ५. हा टक लावून **बघत आहे** | १०. संवगड्या, तूं मला **ओळखतोस?** |

ह्या सर्व ठिकाणीं क्रिया **केव्हां** होत आहे असें आपणांस कळतें बरें ! विचार केल्यास आपल्या ध्यानांत येईल कीं, वरच्या सर्व वाक्यांवरून क्रिया "**चालू आहे**" असेंच आपणांस कळत आहे.

[ २ ]

आतां हीं खालील दुसरीं वाक्यें पहा—

| | |
|---|---|
| १. काल शाळा **सुटली** | ७. राम वनास **गेला** |
| २. विठू घरीं **आला** | ८. सीताही त्याबरोबर **गेली** |
| ३. त्यानें आंघोळ **केली** | ९. तीं पंचवटीस **पोंचलीं** |
| ४. तो यथेच्छ **जेवला** | १०. तेथें रावण **आला** |
| ५. विटी–दांडू **खेळला** | ११. त्यानें सीतेला लंकेंत **नेलें** |
| ६. व सोबत्यांबरोबर बागेंत **गेला** | १२. त्यामुळें रामानें रावणास **मारिलें** |

या वाक्यांतील गोष्टी **केव्हां** घडल्या असें आपणांस कळत आहे बरें ?

ह्या सर्व ठिकाणीं क्रिया "**पूर्वी** म्हणजे **मागें** झाली" असें आपल्यास कळून येत आहे.

[ ३ ]

आतां खालील वाक्यांवरून क्रिया **केव्हां** होत असल्याचें कळत आहे, याचा विचार करूं.

| | |
|---|---|
| १. पन्नास वर्षांनीं काय **होईल** ? | ५. ऐक्य सर्वत्र **नांदेल** |
| २. सर्व लोक सुशिक्षित **होतील** | ६. आपण पराक्रमी **होऊं** |
| ३. स्त्रियाही सुशिक्षित **होतील** | ७. सत्याचें रक्षण **करूं** |
| ४. भांडणें पार नाहींशीं **होतील** | ८. सोन्याचा दिवस **उगवेल** |

ह्या प्रत्येक वाक्यावरून क्रिया "**पुढें होणार आहे**" असें आपल्यास कळत आहे.

अशा रीतीनें क्रिया आतां '**चालू आहे,**' कीं '**मागें झाली,**' कीं '**पुढें व्हावयाची आहे,**' या गोष्टी आपल्यास वाक्यांतील

क्रियापदावरून विशेषतः कळतात; म्हणजे सांगणारा कोणत्या वेळीं क्रिया घडली असें सांगत आहे, ती **क्रियेची वेळ** कळते. ह्या वेळेलाच "**काळ**" असें दुसरें नांव आहे. क्रिया चालू आहे असें दर्शविणारा तो "**वर्तमानकाळ**", मागें क्रिया झाली असें दर्शविणारा तो "**भूतकाळ**" व क्रिया पुढें होणार आहे, असें दर्शविणारा तो "**भविष्यकाळ**", अशीं त्यांचीं नांवें आहेत.

[क] झाड **वाढतें** (येथें क्रिया केव्हां घडत आहे?) क्रिया **चालू** आहे.
झाड **वाढलें आहे** ( ,, ,, ) क्रिया **चालू** आहे.
झाड **वाढत आहे** ( ,, ,, ) क्रिया **चालूच** आहे.
झाड **वाढत असतें** ( ,, ,, ) क्रिया **चालूच** आहे.

ह्या सर्व ठिकाणीं क्रिया '**चालू आहे**' असेंच कळत आहे; यावरून अशा प्रकारचीं क्रियापदें बहुधा "**वर्तमानकाळ**" दाखवितात.

[ख] मी **जेवलों** (येथें क्रिया केव्हां घडत आहे?) क्रिया **मागें** झाली आहे
मी **जेवलों होतों** ( ,, ,, ) क्रिया **मागें** झाली आहे
मी **जेवीत होतों** ( ,, ,, ) क्रिया **मागें** झाली आहे
मी **जेवीत असें** ( ,, ,, ) क्रिया **मागें** झाली आहे

ह्या सर्व ठिकाणीं क्रिया '**मागेंच** होऊन गेली' असें कळत आहे; यावरून अशा प्रकारचीं क्रियापदें बहुधा "**भूतकाळीं**" असतात.

[ग] पाऊस **पडेल** (येथें क्रिया केव्हां घडत आहे?) क्रिया **पुढें** होणार आहे
पाऊस **पडला असेल** ( ,, ,, ) क्रिया **पुढें** होणार आहे
पाऊस **पडत असेल** ( ,, ,, ) क्रिया **पुढें** होणार आहे

ह्या सर्व ठिकाणीं क्रिया '**पुढें** व्हावयाची आहे,' असें कळत आहे; ह्यावरून अशा प्रकारचीं क्रियापदें बहुधा "**भविष्यकाळीं**" असतात.

  

एवढ्या पाहण्यावरून आपल्यास काय समजलें ?

**१. क्रियापदावरून "काळ" म्हणजे क्रिया होण्याची वेळ कळते.**

**२. काळ तीन आहेत. (१) वर्तमान, (२) भूत व (३) भविष्य.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. **काळ** म्हणजे काय ? २. **काळ** किती आहेत ?

३. खालील वाक्यांतील **काळ** ओळखाः—

(१) पंचम जॉर्ज हे एडवर्ड बादशहांचे चिरंजीव **आहेत.** (२) ते सन १९११ मध्यें गादीवर **बसले.** (३) त्यांस ईश्वर चिरायु **करो.** (४) आगगाडी सुरू **झाली.** (५) देव आपल्यास **संभाळितो.** (६) जो अगोदर **येईल,** (७) त्याला खाऊ **मिळेल.** (८) मी तुमचें काम **ऐकेन.** (९) खोटें बोलणाऱ्या मुलास शिक्षक **रागावतात.** (१०) बाबांनीं मला हें घड्याळ **दिलें.** (११) विद्येपासून पैसा **मिळतो** व सुख **होतें.** (१२) माझी परीक्षा **उतरली,** (१३) पण मी नोकरी **करणार नाहीं.**

४. पुढील वाक्यांतील क्रियापदांचा काळ बदलून त्यांचा भविष्यकाळीं उपयोग कराः—

(१) रामा जेवतो. (२) गोविंदा आला. (३) पक्षी उडाले. (४) रामा पुस्तक वाचतो. (५) गोविंदानें पुस्ती काढली.

५. पुढील वाक्यांतील क्रियापदांचा काळ बदलून त्यांचा भूतकाळीं उपयोग कराः—

(१) पक्षी उडतील. (२) मुलें खेळतात. (३) रामा पुस्तक वाचील. (४) मी पतंग उडवीन. (५) शेतकरी शेतें नांगरतील.

---

# १३. प्रयोग – १

## [ १ ]

'गोविंदा जाते,' 'मनी चालतो,' असें आपण कधीं बोलत नाहीं, 'गोविंदा जातो' व 'मनी चालते' असेंच आपण बोलतों; 'मी खाल्लेंस' व 'तूं जेवलांत' असेंही आपण कधीं बोलत नाहीं, तर 'मी खाल्लें' व 'तुम्ही जेवलांत' असेंच आपण म्हणतों; 'त्यानें गाईस मारितो' असें आपण बोलत नाहीं, तर 'तो गाईस मारितो' असें तरी म्हणतों; किंवा 'त्यानें गाईस मारिलें' असें तरी म्हणतों. ह्यावरून आपल्या बोलण्यांत कांहीं एक प्रकारची **रीत** किंवा **जुळणी** आहे, असें दिसतें. ही **जुळणी** कशा प्रकारची असावी बरें ?

| येथें | [ **कर्ता बदलला** ] | कीं | [ **क्रियापद बदलतें** ] |
|---|---|---|---|
| प्र० पु० | मी, आम्ही | | जातों |
| द्वि० पु० | तूं, तुम्ही | | जातोस, जातां |
| तृ० पु० | तो, ती, तें | | जातो, जाते, जातें |
| | ते, त्या, तीं | | जातात |

किंवा—

| | | | |
|---|---|---|---|
| तृ० पु० | पु० | रामा | जातो |
| ,, ,, | स्त्री० | मनी | जाते |
| ,, ,, | न० | मूल | जातें |
| ,, ,, | अ०व० | मुलें | जातात |

येथें जातो हें अकर्मक क्रियापद आहे. त्याऐवजीं **सकर्मक** क्रियापद घेऊन पाहूं:—

| येथेंही | [**कर्ता बदलला**] | कीं | [**क्रियापद बदलतें**] |
|---|---|---|---|
| प्र० पु० | मी, आम्ही, | (आंबा) | खातों |
| द्वि० पु० | तूं, तुम्ही, | (आंबा) | खातोस, खातां |
| तृ० पु० | तो, ती, तें | (आंबा) | खातो, खाते, खातें |
| | ते, त्या, तीं | (आंबा) | खातात |

| किंवा— | [**कर्ता बदलला**] | कीं | [**क्रियापद बदलतें**] |
|---|---|---|---|
| तृ० पु० पु० | रामा | (आंबा) | खातो |
| ,, ,, स्त्री० | मनी | (आंबा) | खाते |
| ,, ,, न० | मूल | (आंबा) | खातें |
| ,, ,, अ०व० | मुलें | (आंबा) | खातात |

**पण**—

| | | | |
|---|---|---|---|
| रामा | पु० | (आंबा) | खातो |
| रामा | स्त्री० | (चिंच) | खातो |
| रामा | नपुं० | (केळें) | खातो |
| रामा | ,, अने० | (केळीं) | खातो |

कर्म बदललें तरी **क्रियापद बदललें नाहीं; तें कर्त्या-प्रमाणेंच** आहे.

यावरून असें दिसतें कीं, आपल्या बोलण्यांतलीं कांहीं वाक्यें **कर्त्याप्रमाणें** म्हणजे कर्त्याच्या पुरुष–लिंग–वचनाप्रमाणें ज्यांत **क्रियापद बदलतें** अशीं असतात.

[ २ ]

आतां खालील वाक्यें पहाः—

| येथें | [ **कर्ता बदलला** ] | तरी | [ **क्रियापद बदलत नाहीं** ] |
|---|---|---|---|
| प्र० पु० | मीं, आम्हीं | ( आंबा ) | खाल्ला |
| द्वि० पु० | तूं, तुम्हीं | ( आंबा ) | खाल्ला |
| तृ० पु० | त्यानें, तिनें, त्यानें | ( आंबा ) | खाल्ला |

| | [ **कर्ता बदलला** ] | तरी | [ **क्रियापद बदलत नाहीं** ] |
|---|---|---|---|
| तृ० पु० पु० | रामानें | ( आंबा ) | खाल्ला |
| ,, स्त्री० | मनीनें | ( आंबा ) | खाल्ला |
| ,, न० | मुलानें | ( आंबा ) | खाल्ला |
| ,, अ० व० | मुलांनीं | ( आंबा ) | खाल्ला |

परंतु, तसाच **कर्ता** ठेवून [ **कर्म बदललें** ] कीं [ **क्रियापद बदलतें** ]

| | | | | |
|---|---|---|---|---|
| तृ० पु० | रामानें | ( पु० ) | आंबा | खाल्ला |
| ,, | रामानें | ( स्त्री० ) | चिंच | खाल्ली |
| ,, | रामानें | ( न० ) | केळें | खाल्लें |
| ,, | रामानें | ( अ० व० ) | आंबे | खाल्ले |
| ,, | रामानें | ( अ० व० ) | चिंचा | खाल्ल्या |
| ,, | रामानें | ( अ० व० ) | केळीं | खाल्लीं |

यावरून असें दिसतें कीं, आपल्या बोलण्यांतलीं कांहीं वाक्यें ज्यांत **कर्माप्रमाणें** म्हणजे कर्माच्या पुरुष-लिंग-वचनाप्रमाणें **क्रियापद बदलतें**, अशीं असतात.

---

# १४. प्रयोग—२

[१]

मागील पाठांत वाक्याची दोन प्रकारची **जुळणी** आपल्यास आढळून आली. आतां वाक्याच्या जुळणीचा आणखी एकादा प्रकार सांपडतो कीं काय, तें पाहूं.

खालील वाक्यांची जुळणी कशाप्रकारची आहे, पहा बरें ?

| | येथें [**कर्ता बदलला**] | तरी [**क्रियापद बदलत नाहीं**] |
|---|---|---|
| प्र०पु० | मीं, आम्हीं | जावें |
| द्वि०पु० | तूं, तुम्हीं | जावें |
| तृ०पु० | त्यानें, तिनें, त्यानें | जावें |
| | त्यांनीं | जावें |

किंवा—

| | | |
|---|---|---|
| तृ०पु० | पु० पुरुषानें, पुरुषांनीं | जावें |
| ,, | स्त्री० स्त्रीनें, स्त्रियांनीं | जावें |
| ,, | न० मुलानें, मुलांनीं | जावें |

येथें जाणें हा अकर्मक धातु आहे, त्याऐवजीं सकर्मक धातु घेऊन पाहूं.

| | (**कर्ता**) | (**कर्म**) | (**क्रियापद**) |
|---|---|---|---|
| प्र०पु० | मीं, आम्हीं | बैलास | बांधिलें |
| द्वि०पु० | तूं, तुम्हीं | बैलास | बांधिलें |
| तृ०पु० | त्यानें, तिनें, त्यांनीं | बैलास | बांधिलें |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| तृ०पु० | पु० | गोवाऱ्यानें | बैलास | बांधिलें |
| ,, ,, | स्त्री० | मोलकरणीनें | बैलास | बांधिलें |
| ,, ,, | न० | मुलानें, मुलांनीं | बैलास | बांधिलें |

किंवा—

| | | | |
|---|---|---|---|
| तृ० पु० | आईनें | मला, आम्हांला | बांधिलें |
| ,, ,, | आईनें | तुला, तुम्हांला | बांधिलें |
| ,, ,, | आईनें | त्याला, तिला, त्यांना | बांधिलें |
| ,, ,, | आईनें ( पु० ) | घोड्यास | बांधिलें |
| ,, ,, | ,, ( स्त्री० ) | शेळीस | |
| ,, ,, | ,, ( न० ) | वासरास | |
| ,, ,, | ,, (अ०व०) | पारडांस | |

ह्या ठिकाणीं **कर्ता बदलला** किंवा **कर्म बदललें**, तरी **क्रियापद बदललेलें दिसत नाहीं**; तें आपलें आहे तसेंच आहे.

[ २ ]

म्हणजे आपल्या बोलण्यांत ( १ ) **कर्त्याप्रमाणें** म्हणजे कर्त्याच्या पुरुष–लिंग–वचनाप्रमाणें **क्रियापदाची जुळणी** असणारीं कांहीं वाक्यें असतात; ( २ ) **कर्माप्रमाणें** म्हणजे कर्माच्या पुरुष–लिंग–वचनाप्रमाणें **क्रियापदाची जुळणी** असणारीं कांहीं वाक्यें असतात; आणि ( ३ ) **कर्ता** व **कर्म** ह्या **दोहोंप्रमाणें जुळणी नसणारींही** कांहीं वाक्यें असतात; असें झालें. तीं कशा प्रकारचीं वाक्यें आहेत हें ओळखावयाचें झाल्यास, वरच्याप्रमाणें बदलूनच पाहिलें पाहिजे.

वाक्यांतील क्रियापदाची कर्त्याप्रमाणें जुळणी किंवा कर्माप्रमाणें

जुळणी किंवा त्यांशिवाय निराळ्या प्रकारची जुळणी याला "**प्रयोग**" असें दुसरें नांव आहे.

क्रियापदाची कर्त्याप्रमाणें जुळणी म्हणजे "**कर्तरिप्रयोग,**" कर्माप्रमाणें जुळणी म्हणजे "**कर्मणिप्रयोग,**" आणि कर्त्याप्रमाणें किंवा कर्माप्रमाणेंही नाहीं, अशी क्रियापदाची जुळणी म्हणजे "**भावेप्रयोग,**" अशीं प्रयोगांचीं नांवें आहेत.

[ कर्तरि-प्रयोगांत क्रियापद अकर्मक असल्यास "**अकर्मक कर्तरि**" व सकर्मक असल्यास "**सकर्मक कर्तरि**" प्रयोग असें म्हणतात. त्याचप्रमाणें भावे प्रयोगांतही क्रियापद अकर्मक असल्यास "**अकर्मक भावे**" व सकर्मक असल्यास "**सकर्मक भावे**" असें म्हणतात. कर्मणि-प्रयोगांत कर्म असतेंच, तेव्हां त्या प्रयोगांत अकर्मक किंवा सकर्मक हें कांहीं सांगण्याची जरूर नाहींच. ]



एवढ्या विचारावरून आपल्यास काय कळून आलें ?

**१. वाक्याची ठराविक रीतीनेंच जुळणी होते.**

**२. क्रियापदाची कर्त्याप्रमाणें किंवा कर्माप्रमाणें किंवा त्याशिवाय निराळ्या प्रकारची जुळणी म्हणजे प्रयोग.**

**३. प्रयोग तीन आहेतः—(१) कर्तरि, (२) कर्मणि व (३) भावे.**

## प्रश्न व गृहपाठ

१. **प्रयोग** कशाला म्हणतात ?

२. वाक्याची किती प्रकारची जुळणी आढळते ?

३. वाक्याची किंवा क्रियापदाची जुळणी कर्त्याप्रमाणें किंवा कर्माप्रमाणें आहे, हें कोणत्या गोष्टींनीं कळतें ?

४. खालील वाक्यांचे, कर्ता–कर्म–क्रियापद सांगून, **प्रयोग** ओळखाः—

(१) आईबाप मुलांवर प्रेम करितात. (२) मागें आपली कीर्ति राहील, (३) असेंच काम आपण करावें. (४) ही मुलगी बावळी दिसते. (५) ते गवळ्यांचे मुलगे रानांत खेळत होते. (६) मित्रा, तूं मला फुलें दिलींस. (७) पांडवांनीं कौरवांस जिंकिलें. (८) मुलांनीं सकाळीं उठावें, (९) स्नान करावें व (१०) अभ्यासास बसावें. (११) सर्वांस आपलें तोंड दिसेल, (१२) अशा रीतीनें कृष्णानें वाटोळ्या पंगती केल्या. (१३) तो सर्वांच्या मध्यें बसला. (१४) एका चित्रशाळेंत तिघे विद्यार्थी होते. (१५) त्यांनीं परीक्षेसाठीं चित्रें तयार केलीं. (१६) पण कोणीं रामाच्या चित्रावर शाई सांडली. (१७) यामुळें त्याला बक्षिस मिळालें नाहीं.

५. तुमच्या वाचावयाच्या धड्यांतील **कर्तरि-प्रयोगा**चीं तीन वाक्यें आणि असल्यास **कर्मणि व भावे ह्या प्रयोगां**चीं दोन दोन वाक्यें हुडकून काढून, घरून लिहून आणा.

---

# १५. विरामचिन्हें

[ १ ]

आपण आतांपर्यंत वाक्याविषयीं, वाक्यांतल्या निरनिराळ्या शब्दांविषयीं व त्या शब्दांच्या एकमेकांशीं असलेल्या संबंधाविषयीं विचार केला. आतां आपण जें बोलतों, तें ज्या अर्थानें आपल्यास बोलावयाचें असतें, तोच अर्थ उत्पन्न होईल अशा रीतीनें जर आपण बोललों नाहीं, किंवा लिहिलेली गोष्ट तोच अर्थ कळेल अशा रीतीनें आपणांस वाचतां आली नाहीं, किंवा तो अर्थ कळण्यासाठीं जशा रीतीनें लिहावयास पाहिजे तसें आपणांस लिहितां आलें नाहीं, तर केव्हां केव्हां फार अनर्थ होण्याचा संभव असतो. कसा तो पहा—

## एका चोराची गोष्ट

एक चोर होता, तो एकदां चोरी करितांना सांपडला; तेव्हां त्याला न्यायाधिशापुढें उभें केलें. त्यानें आपली सुटका होण्यासाठीं "मी पुनः चोरी करणार. नाहीं केली तर मला शिक्षा व्हावी" असें लिहून दिलें. न्यायाधिशानें दया करून त्यावेळीं त्याला सोडिलें. पुढें कांहीं दिवस गेल्यावर तो चोर पुनः चोरी करितांना सांपडला. न्यायाधिशापुढें नेल्यावर "मी पुनः चोरी करणार नाहीं. केली तर मला शिक्षा व्हावी" असें तूं लिहून दिलें होतेंस ना? म्हणून न्यायाधिशानें विचारलें. चोर म्हणाला, "माझा कांहीं गुन्हा नाहीं, मीं लिहून दिलें आहे, त्याप्रमाणें वागलों. मला सोडून द्यावें."

आतां न्यायाधिशानें त्या लुच्चा चोराला सोडून द्यावें काय? वरची गोष्ट नीट लक्षपूर्वक पाहिल्यास आपल्या ध्यानांत येईल कीं, वरतीं नुसतें एक टिंब पुढचें मागें पडल्याबरोबर अर्थाचा अनर्थ झाला! तर ह्यासाठीं असल्या खुणांबद्दलही आपण आतां थोडा विचार करूं.

[ २ ]

१. खालील वाक्यें बोलण्याचे वेळीं आपण कोठें किती थांबतों, तें पाहूं:—

(अ) इकडे, जावईबुवा, निघण्यास उशीर किती, लौकर आटोपा, अशी घाई करूं लागले.

(आ) गोपाळा, मला भेटून, शाळेस गेला.
रामा, काशी, मनी, हीं भावंडें होत.

(इ) रांगोळ्या घातल्या, पानें वाढलीं, व्याही–मंडळी आली, फक्त बाबासाहेबच यायचे उरले आहेत.

ह्या वाक्यांत जेथें (,) अशी खूण केली आहे, तेथें आपण **थोडेंसें थांबतों;** हें सहज ध्यानांत येईल. थोडें थांबण्यासाठीं ही खूण असावी, असें दिसतें; म्हणून आपण हिला **"स्वल्पविराम"** असें म्हणूं.

२. आतां खालील वाक्यें पहा—

(अ) यापुढें सात वर्षेंपर्यंत चांगला पाऊस पडेल; पीक भरपूर येईल; महागाई हा शब्दही लोक विसरून जातील; परंतु हीं सात वर्षें संपल्यावर त्या सर्व सुखाचा एकदम वचपा निघेल.

(आ) मेघ उदकाचा संचयही करणार नाहींत; धरित्री धान्याचें बोटूकही दाखविणार नाहीं; जिकडे तिकडे हाहाक्कार उडून जाईल; याप्रमाणें हीं सात वर्षें दु:खाचीं जातील.

(इ) बाजारांतून कोबी, मुळा, व वांगीं, ही भाजी; डाळिंबें, मोसंबें, द्राक्षें, पेरू, हीं फळें; पत्रावळी, द्रोण, व केळीचीं पानें; आणि लवंगा, सुपारी, वेलदोडे, इ० विड्याचें सामान; घेऊन या.

ह्या वाक्यांत (;) ही खूण केलेल्या ठिकाणीं आपण स्वल्पविरामापेक्षां थोडें ज्यास्त थांबतों; अगदीं पूर्ण थांबत नाहीं; म्हणून या खुणेला " **अर्धविराम** " असें आपण म्हणूं.

३. आतां खालील ठिकाणीं आपण किती थांबतों तें पहा—

“ एक होती ऊ. तिला झाली इू. ती गेली जेवायला. तिला मिळाला पैसा. तिनें आणली भाजी. ती खसाखसा चिरली. रटारटा शिजवली. मग मटामटा खाल्ली.”

ह्या गोष्टींत जेथें जेथें वाक्य पुरें होत आहे, तेथें तेथें आपण स्वल्पविराम व अर्धविराम ह्यांच्यापेक्षां ज्यास्त थांबतों. “ जर चोरी केली,” एवढें वाक्य आपण म्हटल्यास, त्या वाक्याच्या शेवटीं आपण पूर्ण थांबत नाहीं; कारण, त्या वाक्यापुढें लगेच त्या वाक्याला जोडूनच दुसरें कांहीं—दुसरें वाक्य—आपल्याला बोलायचें आहे, हें कळतें; “ पण जर चोरी केली, तर शिक्षा होते.” यांत पुढचें वाक्य संपल्यावर आपणांस कांहीं अर्धवट बोलणें वाटत नाहीं, तेथें आपण **पूर्णपणें थांबतों.** अशा पूर्णपणें थांबण्याच्या ( . ) ह्या खुणेला आपण “ **पूर्णविराम** ” असें म्हणूं.

[ ३ ]

४. आतां खालील ठिकाणीं कोणता अर्थ कळत आहे, व त्यासाठीं कोणत्या खुणेचा उपयोग केला आहे, तें पहा:—

( अ ) तूं आज किती पेरू खाल्ले ?

( आ ) घूस बिळें करील म्हणून घर बांधूं नये काय ?

( इ ) तूं काय केलें ? तुला कोण रागावलें ? तुला कोणीं मारिलें ?

ह्या सर्व ठिकाणीं बोलणारा दुसऱ्यास **प्रश्न** विचारीत आहे, असें

स्पष्ट कळतें. म्हणून (?) ही खूण प्रश्न करण्याचा अर्थ दाखविण्यासाठीं येते; असें झालें. हिला आपण "**प्रश्नचिन्ह**" असें म्हणूं.

५. (अ) अबब! किती तरी हे आंबे!

(आ) अयाई! काय ही दशा तरी!

ह्या ठिकाणीं (!) ह्या खुणेनें मनाला एकदम वाटणारा विकार कळत आहे; व तो दाखविणारे **उद्गार** एकदम तोंडांतून बाहेर पडत आहेत; म्हणून ह्यांना "**उद्गारचिन्ह**" असें म्हणण्यास हरकत नाहीं.

ह्याप्रमाणें कोठें कोठें योग्य अर्थ कळण्याकरितां थोडें, त्यापेक्षां ज्यास्त किंवा पूर्ण, असें थांबण्यासाठीं; आणि केव्हां केव्हां प्रश्न केला आहे किंवा मनाचा उद्गार एकदम बाहेर पडला आहे, तो अर्थ ध्यानांत येण्यासाठीं; ह्या विरामचिन्हांच्या खुणा लिहितांना करितात. आपणांस अशा प्रकारच्या खुणा कोणीं न सांगतां लिहितेवेळीं योग्य रीतीनें करितां आल्या पाहिजेत.

(१) पुष्कळ नामें, विशेषणें, जवळ जवळ आलीं, किंवा लहान लहान वाक्यें जवळ जवळ आलीं, किंवा मोठें वाक्य असल्यामुळें वाक्यांतील शब्दांचा ज्यांच्याशीं संबंध असतो, तेवढेच शब्द एकावेळीं उच्चारावयाचे असले, तर आपण थोडें थांबतों; व तशा वेळीं "**स्वल्पविराम**" ही खूण करितात. (२) मोठ्या वाक्यांत कांहीं नामें, विशेषणें किंवा लहान लहान वाक्यें ह्यांकरितां स्वल्पविराम येऊन, पुढें आणखी स्वल्पविरामापेक्षां ज्यास्त थांबावें लागणारीं अशीं अनेक वाक्यें किंवा शब्दसमूह आले तर "**अर्धविराम**" करितात. (३) एकेरी वाक्य अथवा अनेक लहान वाक्यें मिळून होणारें वाक्य पूर्ण

झालें कीं, त्याच्या शेवटीं "**पूर्णविराम**" ही खूण करितात. आणि (४) प्रश्न करण्यासाठीं "**प्रश्नचिन्ह**" व (५) मनाचा उद्गार व्यक्त करण्यासाठीं "**उद्गारचिन्ह**" करितात.



आज आपण काय विचार केला ?

**१. आपल्या बोलण्यांतला योग्य अर्थ लिहिण्यावरून स्पष्ट कळण्यासाठीं योग्य तेवढें थांबण्याच्या कांहीं खुणा असतात.**

**२. ह्या खुणांना "विरामचिन्हें" असें म्हणतात.**

**३. स्वल्पविराम, अर्धविराम, पूर्णविराम, प्रश्नचिन्ह व उद्गारचिन्ह ह्या त्या मुख्य खुणा आहेत.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. विरामचिन्हांचा उपयोग काय ? त्यांपैकीं प्रमुख कोणतीं ?

२. खालील ठिकाणीं कोणतीं चिन्हें हवींत, तीं सांगा:—

(१) फाल्गुन चैत्र वैशाख व ज्येष्ठ मिळून उन्हाळा

(२) चैत्रांत पाडव्याचा सण येतो त्या दिवशीं गुढ्या उभारतात

(३) ईश्वराची शक्ति किती मोठी आहे ती सांगतां येणार नाहीं

(४) हें पुस्तकांचें कपाट कशाचें केलें आहे लाकडाचें

(५) झाडें कोणीं उत्पन्न केलीं ईश्वरानें

(६) ही जमीन वृक्ष वेली। डोंगर कडे दऱ्या पर्वत। नद्या समुद्र सरोवरें। वाघ सिंह गाय घोडा हत्ती सर्प हे प्राणी। त्यानेंच उत्पन्न केले आहेत

(७) लहान मोठा कसाही मनुष्य असो त्याला शिव्या द्याव्या। मूल पाहिलें कीं त्याच्या खोड्या कराव्या। व साधल्यास चोरीही करावी। असा त्याचा उद्योग चाले

(८) हा केवढा थोरला प्रकाशाचा गोळा।<br>
हा किती आल्हादकारक चंद्र।<br>
अहो, तें कांहीं पुसूं नका।

---

# १६. शब्दांची फोड

आतांपर्यंत आपण शब्दांच्या आठ मुख्य **जाति, लिंग, वचन, विभक्ति, काळ व प्रयोग,** इतक्या गोष्टींचा विचार केला. ह्या सर्व गोष्टी आतां आपल्याला नीट समजून सांगतां व लिहितां आल्या पाहिजेत; त्याची रीत आतां आपण ठरवूं.

| | |
|---|---|
| **नाम** / **सर्वनाम** | यांतील मूळ शब्द, जात, लिंग, विभक्ति व वचन. |
| **विशेषण** | कोणत्या शब्दाचें तें. |
| **क्रियापद** | यांतील मूळ शब्द म्हणजे धातु, सकर्मक कीं अकर्मक, काळ, लिंग, पुरुष, वचन व प्रयोग. |
| **अव्यय** | कोणतें तें नांव. |

शब्दासंबंधानें ह्या गोष्टी आपल्यास सहज सांगतां येतील. त्या पद्धतशीर रीतीनें आपण लिहून पाहूं या.

## वाक्यें

### १. "सूर्य सकाळीं पूर्वेकडे उगवतो."

**सूर्य**— हें सूर्य या विशेषनामाचें, पुल्लिंगी, प्रथमेचें एकवचन; हा उगवतो ह्या क्रियापदाचा कर्ता.

**सकाळीं**—हें सकाळ या सामान्यनामाचें, स्त्रीलिंगी, सप्तमीचें एकवचन.

**पूर्वेकडे**— हें पूर्व या विशेषनामाचें, स्त्रीलिंगी, एकवचन.

**कडे**— हें शब्दयोगी अव्यय.

**उगवतो**— क्रियापद. हें उगव ह्या अकर्मक धातूचें, वर्तमानकाळीं, पुल्लिंगी, तृतीय पुरुषाचें एकवचन.

ह्या वाक्यांत सूर्य हा कर्ता, उगवतो हें क्रियापद, हा **अकर्मककर्तरि प्रयोग.**

**२. "तेव्हां मोठा व चकचकीत दिसतो."**

**तेव्हां**— हें क्रियाविशेषण अव्यय.

**मोठा**— हें क्रियाविशेषण.

**व**— हें उभयान्वयी अव्यय.

**चकचकीत**— हें क्रियाविशेषण अव्यय.

**दिसतो**— क्रियापद. हें दिस ह्या अकर्मक धातूचें, वर्तमानकाळीं, पुल्लिंगी, तृतीय पुरुषाचें एकवचन.

ह्या वाक्यांत सूर्य हा कर्ता, दिसतो हें क्रियापद; हा **अकर्मककर्तरि प्रयोग.**

**३. "स्त्रिया गौरीपुढें सुंदर रांगोळ्या घालितात."**

**स्त्रिया**— हें स्त्री या सामान्यनामाचें, स्त्रीलिंगी, प्रथमेचें अनेकवचन; हा घालितात ह्या क्रियापदाचा कर्ता.

**गौरीपुढें**— हें गौर या विशेषनामाचें, स्त्रीलिंगी, एकवचन.

**पुढें**— हें शब्दयोगी अव्यय.

**सुंदर**— हें रांगोळ्या ह्या शब्दाचें विशेषण.

**रांगोळ्या**—हें रांगोळी या सामान्यनामाचें, स्त्रीलिंगी, द्वितीयेचें अनेकवचन; हें घालितात ह्या क्रियापदाचें कर्म.

**घालितात**—क्रियापद. हें घाल ह्या सकर्मक धातूचें, वर्तमानकाळीं, स्त्रीलिंगी, तृतीय पुरुषाचें अनेकवचन.

ह्या वाक्यांत स्त्रिया हा कर्ता, रांगोळ्या हें कर्म, घालितात हें क्रियापद; हा **सकर्मककर्तरि प्रयोग.**

### ४. "मनीनें काल चावा घेतला."

**मनीनें**—हें मनी या विशेषनामाचें, स्त्रीलिंगी, तृतीयेचें, एकवचन; हा घेतला ह्या क्रियापदाचा कर्ता.

**काल**—हें क्रियाविशेषण अव्यय.

**चावा**—हें चावा या सामान्यनामाचें, पुल्लिंगी, प्रथमेचें एकवचन; हें घेतला ह्या क्रियापदाचें कर्म.

**घेतला**—क्रियापद. हें घे ह्या सकर्मक धातूचें, भूतकाळीं, पुल्लिंगी, तृतीय पुरुषाचें एकवचन.

ह्या वाक्यांत मनीनें हा कर्ता, चावा हें कर्म, घेतला हें क्रियापद; हा **कर्मणि प्रयोग.**

### ५. "म्हणून नानानें तीस जोत्याखालीं ढकलिलें."

**म्हणून**—हें उभयान्वयी अव्यय.

**नानानें**—हें नाना या विशेषनामाचें, पुल्लिंगी, तृतीयेचें एकवचन; हा ढकलिलें ह्या क्रियापदाचा कर्ता.

**तीस**—हें ती या तृतीयपुरुषवाचक सर्वनामाचें, स्त्रीलिंगी, द्वितीयेचें एकवचन; हें ढकलिलें ह्या क्रियापदाचें कर्म.

**जोत्याखालीं**—हें जोतें या सामान्यनामाचें, नपुंसकलिंगी एकवचन.

**खालीं**—हें शब्दयोगी अव्यय.

**ढकलिलें**—क्रियापद. हें ढकल ह्या सकर्मक धातूचें, भूतकाळीं, नपुंसकलिंगी, तृतीय पुरुषाचें एकवचन.

ह्या वाक्यांत नानानें हा कर्ता, तीस हें कर्म, ढकलिलें हें क्रियापद; हा **सकर्मकभावे प्रयोग.**

---

## मॅक्मिलन्चीं शालोपयोगी पुस्तकें

**करुणेश मराठी किस्से** नं. १ ते ५, किं. प्रत्येकीं अर्धा आणा

**महाराष्ट्राच्या इतिहासांतील सोप्या गोष्टी**, गोविंद सखाराम सरदेसाई, बी. ए., कृत; किं. रु. ०—६—०

**इंग्लंडचा अर्वाचीन इतिहास**, परशुराम हरी बर्वे, एम्. ए., बी. टी., कृत; किं. रु. २—८—०

**संस्कृत-अभिनवा पाठावलिः**, प्रो. विनायक पांडुरंग बोकील, एम्. ए., एस्. टी. सी. डी., कृत; प्रथमा, किं. ८ आणे, द्वितीया, १२ आणे, तृतीया, १ रुपया

**वाग्विहार, भाग १**, प्रो. गणेश हरि केळकर, एम्. ए., कृत; किं. रु. १—०—०

**वाग्विहार, भाग २**, प्रो. वासुदेव बळवंत पटवर्धन, बी. ए., कृत; किं. रु. १—४—०

**जगाचें वाङ्मय**, रा. प. सबनीस, एम्. ए. (केंब्रिज्), एफ्. आर्. ई. एस्., कृत; किं. रु. १—४—०

**महाराष्ट्र वाङ्मय-प्रवेशिका**, गंगाधर गोविंद कानेटकर, एम्. ए., कृत; भाग १ ला, किं. १२ आणे, भाग २ रा, किं. १ रु.

**रसतरंगिणी, प्राचीन व अर्वाचीन कवितांतील निवडक वेंचे**, सीताराम वासुदेव पेंडसे, बी. ए., एम्. सी. पी., कृत; किं. रु. २—८—०

**संस्कृत गद्यावली**, पांडुरंग वामन काणे, कृत; किं. रु. १—८—०

**संस्कृत पद्यावली**, पांडुरंग वामन काणे, कृत; किं. रु. १—०—०

**संस्कृत-शिक्षिका**, रा. ब. कमलाशंकर प्राणशंकर त्रिवेदी, बी. ए., कृत; किं. रु. २—०—०

**मोजमापाचा पाया**, पद्मनाभ आत्माराम धोंड, एम्. ए., कृत; पुस्तक १ लें, किं. ३ आणे; पुस्तक २ रें, किं. ५ आणे

**चित्रबोध अंकगणित**, वि. पां. बोकील, एम्. ए., एस्. टी. सी. डी., व ब. ग. करंदीकर, कृत; किं. ०—६—०

**नाट्यरूप महाराष्ट्र**, विठ्ठल दत्तात्रय घाटे, एम्. ए., बी. टी., टी. डी. (लंडन), कृत; किं. १ रु.

**आपलें बोलणें**, मोरेश्वर सखाराम मोने, कृत; पुस्तक १ लें, किं. ४ आणे; २ रें किं. ४ आणे; ३ रें किं. ५ आणे; ४ थें किं. ६ आणे; संक्षिप्त मराठी व्याकरण किं. ४॥ आणे

**सामान्यज्ञान-प्रवेशिका**, गंगाधर गोविंद कानेटकर, एम्. ए., कृत; पुस्तक १ लें, किं. ६ आणे, पुस्तक २ रें किं. ८ आणे

**शास्त्रीय-विषय परिचय**, मेघश्याम रघुनाथ इंगळे, बी. एस्सी., कृत; सेट १, २, ३ व ४, प्रत्येकीं किं. ६ आणे

---

Macmillan's Series of New Marathi Grammars: Book 1.
By M. S. Mone, Price 4 Annas. 1933.